राष्ट्रीय चरित्रमाला

# स्वामी रामानंद तीर्थ

लेखक

अनंत भालेराव



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# अनुक्रम


पृष्ठ

१) हैद्राबाद, गुलामीचा अवशेष — १

२) जन्म, बालपण व शिक्षण — १२

३) कामगार क्षेत्रात पदार्पण — २१

४) मराठवाड्यात आगमन — २९

५) शिक्षण क्षेत्रातून प्रत्यक्ष राजकारणाकड — ३९

६) स्टेट कॉंग्रेसची स्थापना व तुरुंगवास — ५०

७) गांधीजींचा सहवास, वैयक्तिक सत्याग्रह — ६४

८) स्वातंत्र्याचा अंतिम लढा — ७७

९) पोलिस कारवाईनंतर — ९१

१०) संघटनेत फाटाफूट : संच विखुरला — १०७

११) संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीत सहभाग — ११९

१२) स्वामीजींची वैचारिक परंपरा — १२६

# १

# हैद्राबाद, गुलामीचा अवशेष

भारतीय स्वातंत्र्याची लढाई खऱ्या अर्थाने १७ सप्टेंबर १९४८ ला संपली. हैद्राबाद संस्थानात १३ सप्टेंबर १९४८ ला जी पोलिस कारवाई करण्यात आली, तिची सांगता १७ सप्टेंबरला झाली. अवघ्या चार दिवसांत भारतीय सेना संस्थानात चारही दिशांनी घुसल्या आणि त्या धडक निजामाच्या किंग कोठीपर्यंत येऊन पोचल्या. तेव्हा हैद्राबादचा बादशहा असणारा निजाम, संस्थानातील एजंट जनरल के. एम. मुन्शी यांच्यासमवेत हैद्राबाद नभोवाणीवर जनतेला उद्देशून बोलला आणि आपले संस्थान भारतीय संघराज्यात आपण नेहमीसाठी व अंतिमतः विलीन करीत आहो अशी त्याने घोषणा केली. त्याच-बरोबर हैद्राबाद स्टेट काँग्रेसचे अध्यक्ष व नेते स्वामी रामानंद तीर्थ यांना आपण मुक्त केले आहे असेही त्याने सांगितले. शेवटी शेवटी निजामाने आपण अगतिक होतो, संस्थानाचा तावा इत्तेहादुल मुस्लिमीन या मुस्लिम जातीयवादी संघटनेने घेतला होता, मंत्रिमंडळात तिचेच प्राबल्य होते आणि या संघटनेचा नेता कासिम रझवी व इत्तेहादची सशस्त्र सेना, रझाकार संघटना यांच्या आदेशाबरहुकूम मला वागावे लागत होते अशी बतावणी केली. ज्या भारत सरकारला व हैद्राबादच्या जनतेला निजाम थापा मारून फसवू बघत होता, त्यांना सत्य काय आहे याची पुरेपूर जाणीव होती. निजाम आणि इत्तेहादुल मुस्लिमीन म्हणजे जातीयवादी, सरंजामदारी, प्रतिगामी सिद्ध-साधकांचा शुद्ध बनाव होता. एकमेकांच्या आड लपत. या शक्तींनी भारताला बरेच छळले.

भारतातील बाकीची सर्व लहान-मोठी संस्थाने आढेवेढे घेत का असेना, भारतीय संघराज्यात सामिल झाली. जुनागढ आणि हैद्राबाद यांनी शेवटपर्यंत त्रास दिला. हैद्राबाद संस्थान तर भारताला आणि भारतीय स्वातंत्र्याला आव्हान देण्याच्या पवित्र्यातच उभे राहिले. भारतीय स्वातंत्र्य अपूर्ण राखण्याची त्याने शर्थ केली आणि या भरात त्याने करू नयेत त्या सर्व गोष्टी केल्या.

हैद्राबादची जनता ज्यांना आपला नेता व हैद्राबादचा मुक्तिदाता म्हणून मानीत होती, ते स्वामी रामानंद तीर्थ यथार्थपणे सांगत असत की, १५ ऑगस्ट १९४७ ला जरी भारत स्वतंत्र झाला असला तरी अजून या देशामध्ये स्वातंत्र्यसूर्याचा प्रकाश पोचू न शकलेला असा प्रदेश आहे आणि तो आहे हैद्राबाद संस्थानाचा. स्वामीजी नेत्यांना नेहमी असे म्हणत की, दक्षिणी संस्कृतीच्या अथवा हिंदु-मुस्लिम ऐक्याच्या तथाकथित कल्पनेच्या आहारी जाऊन हैद्राबाद असेच राहू दिले तर भारताच्या पोटातच एक 'अल्सर' जोपासले जाईल आणि भारतीय स्वातंत्र्याच्या अनारोग्याला ते कारणीभूत ठरेल. भारतामध्ये स्वातंत्र्याचे प्रतीक म्हणून तिरंगी राष्ट्रध्वज फडकवण्यात आला तेव्हा हैद्राबादच्या जनतेला स्वामीजींनी तो हैद्राबाद संस्थानभर हैद्राबाद शहरांपासून खेड्यापाड्यापर्यंत आपापल्या घरावर आणि सार्वजनिक ठिकाणी फडकवण्याचा आदेश दिला होता. भारतीय स्वातंत्र्याची ही अनामत आहे. प्राणपणाने तिचे रक्षण करा आणि लक्षात ठेवा की, भारतीय स्वातंत्र्याची अखेरची लढाई आपल्या राज्यातच होणार आहे. हैद्राबाद संस्थान हे गुलामीचे अखेरचे केन्द्र आहे. पारतंत्र्य कायमचे संपविण्याची जबाबदारी इतिहासाने आपल्यावर सोपविली आहे. ही लढाई जिंकलीच पाहिजे. यशानेच या लढाईची सांगता झाली पाहिजे, कारण ती भारतीय जनतेच्या अधिसत्तेची आणि स्वातंत्र्याची लढाई आहे. स्वामीजींचा हा निर्धार रीतसर पोलिस कारवाई होऊन पूर्णत्वास गेला.

हैद्राबाद संस्थानाच्या अस्तित्वाशी आणि समाप्तीशी एका फकिराचा आणि एका संन्याशाचा संबंध आला. हा योगायोगही असू

शकेल. परंतु काळाने या योगायोगाला ऐतिहासिक बनविले हे मात्र खरे आहे. पोलिस कारवाईच्या वेळी जो निजाम, मीर उस्मान अली राज्यावर होता, तो आसफजाही घराण्यातील सर्वांत शेवटचा व सातवा निजाम होता. त्याच्या आधी सहावा निजाम, मीर महबूब अली राज्य करीत होता. त्याच्या कारकीर्दीतील एक गोष्ट तेव्हाच्या हैद्राबाद संस्थानात सर्वज्ञात होती. आसफजाही घराण्याच्या बादशहांमध्ये असा परिपाठ पडला होता की, वर्षातून एकदा बहुतेक प्रत्येक निजाम औरंगजेबाची कबर असलेल्या खुलताबादी येत असे व काही दिवस त्याचा तळ तेथे पडत असे. महबूब अली असाच एकदा औरंगाबादी व खुलताबादी आला होता. हत्तीवरून त्याची स्वारी चालली असताना त्याच्या नजरेला रस्त्याच्या कडेला बसलेला एक फकीर पडला. महबूब अली दानशूर होता व फार श्रद्धाळू होता. पायउतार होऊन तो फकिराकडे आला व त्याने फकिराचे आशीर्वाद मागितले. फकिराने आशीर्वाद म्हणून निजामाच्या पदरात भाकरीचे तुकडे टाकले. हे तुकडे नेमके सात होते. महबूब अली आणखी मागू लागला तर फकीर म्हणाला, 'माझी पुंजी संपली.' फकिराने दिलेल्या भाकरीच्या सात तुकड्यांचा अर्थ पुढे असा लावला गेला की, आसफजाही घराण्याचा अस्त सात निजामांच्या नंतर होईल आणि झालेही असेच. मीर उस्मान अली खान हा आसफ-जाही वंशातील सातवा आणि अखेरचा निजाम ठरला. या फकिराने जे भाकित वर्तविले होते ते योगायोगाने खरे झाले. परंतु नियतीने पुनरुक्ती करून एक संस्थान म्हणून हैद्राबादचे अस्तित्व संपविण्याच्या प्रक्रियेशी आणखी एका संन्याशाचा संबंध जोडून दिला. आसफजाही घराणे आणि भारतातील संस्थानांपैकी सर्वांत शेवटचे संस्थान संप-विण्याची अवघड व नाजूक कामगिरी सर्वार्थाने संन्याशी असणाऱ्या स्वामी रामानंद तीर्थ यांनी बजावली.

स्वामीजींनी ही जी ऐतिहासिक कामगिरी पार पाडली ती किती अवघड व नाजूक होती याची कल्पना येण्यासाठी हैद्राबाद संस्थानाचा परिचय होणे आवश्यक आहे. सामान्य समज असा की, हैद्राबादमध्ये भारतीय लष्कर घुसले व पोलिस कारवाई झाली म्हणून हैद्राबाद मुक्त झाले. परंतु हा समज वरवरचा आहे. ही घटिका जवळ यावी आणि

हैद्राबादमध्ये स्वातंत्र्यवादी जनतेच्या शक्ती प्रबळ व्हाव्यात यासाठी ज्या थोड्या नेत्यांनी व व्यक्तींनी प्रयत्न केले, त्यांत स्वामीजी अग्रभागी होते. त्यांच्याच नेतृत्वाखाली हैद्राबाद संस्थानातील जनतेचे स्वातंत्र्य-आंदोलन संघटित झाले. निजाम आणि त्याच्या पाठीशी असणाऱ्या तमाम जातीयवादी शक्ती असा दावा करीत होत्या की, हैद्राबादमधील जनता पूर्णतया संतुष्ट व समाधानी असून तिची निजामावर निष्ठा आहे. हैद्राबादबाहेरच्या काही व्यक्तींना व विशेषतः स्वातंत्र्यासाठी ब्रिटिशांच्या विरुद्ध लढणाऱ्या इंडियन नॅशनल कॉंग्रेसला हैद्राबाद नकोसे आहे. तेच चिथावणी देतात व हैद्राबादच्याविरुद्ध फुकाची ओरड करतात. हैद्राबादच्या जनतेला तिच्या मर्जीवर सोडले तर जातिधर्म निरपेक्षपणे हैद्राबादची जनता निजामाच्याच छत्राखाली राहणे पसंत करील. संस्थानातील ज्या लोकांनी या मतलबी व खोटया प्रचारला आव्हान दिले त्यांचे नेतृत्व स्वामीजींनी केले. इतिहासाने हैद्राबादला आणि स्वामीजींना फारसा अवधीही दिला नाही. भारतामध्ये जे काम कॉंग्रेसने ६०–७० वर्षांच्या प्रदीर्घ अवधीत केले तेच काम हैद्राबादमध्ये अवघ्या दहा वर्षांत करावे लागले. स्टेट कॉंग्रेसचा पहिला सत्याग्रह १९३८ ला झाला व बरोबर १९४८ मध्ये पोलिस कारवाई झाली. भारतीय स्वातंत्र्य आंदोलनातील सर्व अवस्था आणि सर्व आवर्ते या अल्पावधीत हैद्राबादमध्ये पूर्ण करावी लागली.

हैद्राबाद संस्थानाचे नाव घेताच त्या काळी काश्मीरशी त्याची तुलना व्हावयाची. या दोन संस्थानांत वैषम्यामुळे राजकीय साधर्म्य निर्माण झाले होते. दोन्ही संस्थाने मोठी. काश्मीर उत्तरेच्या महाद्वाराशी वसलेले, तर हैद्राबाद दक्षिणेचा दिंडी दरवाजाच. काश्मीरचा राजा हिंदूधर्मीय तर हैद्राबादचा मुस्लिम. काश्मीरमध्ये बहुसंख्य जनता मुस्लिम तर हैद्राबादची हिंदू. काश्मीरमध्ये राष्ट्रीय स्वातंत्र्याची आघाडी राष्ट्रीय परिषदेने सांभाळली. शेख अब्दुल्ला काश्मीरचे सर्वश्रेष्ठ नेते होते. हैद्राबादमध्ये राष्ट्रीय परिषदेची जागा स्टेट कॉंग्रेसने घेतली होती. स्वामी रामानंद तीर्थ हे हैद्राबादच्या जनतेचे सर्वमान्य नेते होते. शेख अब्दुल्ला आणि स्वामीजी या दोहोंचे अखिल भारतीय राज-

कारणातील स्थान पुरोगामी व समाजवादी नेहरूंच्या अनुयायांत होते. फरक या दोन संस्थानांत असा होता की, केवळ काश्मीरच नव्हे तर इतर अनेक संस्थानांमध्ये संस्थानी जनतेला किमान नागरी हक्क मिळाले होते आणि जबाबदार राज्यपद्धतीच्या दिशेने या संस्थानांनी बरीच वाटचाल केली होती. या उलट हैद्राबाद हे पूर्णतया सरंजामी अवस्थेत होते. एकछत्री राजेशाहीच्या अंधकारात हैद्राबादची प्रजा चाचपडत होती. सर्वमान्य नागरी हक्कांपासून हैद्राबादची जनता वंचित ठेवण्यात आली होती. कसलेही स्वातंत्र्य नव्हते. साध्या शोकसभादेखील परवानगी-वाचून घेता येत नव्हत्या. संघटना स्वातंत्र्याला शासकांचा जबरदस्त विरोध होता. इतरत्र संस्थानी प्रजा परिषदा होत्या तर हैद्राबादमध्ये स्टेट काँग्रेसवर तिच्या जन्मापासूनच बंदी लादण्यात आली होती. शिक्षणाचे प्रमाण नाममात्र होते. खाजगी शाळा काढण्यासाठी परवानगी घेण्याची सक्ती होती. व शक्यतोवर खाजगी शाळांना परवानगी देऊ नये असेच धोरण होते. सर्वत्र उर्दू भाषेची जबरदस्ती होती. माध्यमिक व दुय्यम शाळांतून उर्दू प्रथम भाषा होती तर मराठी, कानडी व तेलगू या तीन प्रादेशिक भाषांना दुय्यम स्थान होते. दुय्यम शिक्षणापासूनच शिक्षणाचे माध्यम उर्दू होते. निजामाच्या नावाने जे उस्मानिया विद्यापीठ कायम करण्यात आले होते ते भारतातले पहिले असे विद्यापीठ होते की जेथे माध्यम उर्दू होते. शाळा कॉलेजातून धर्माच्या आधारे भेदभाव केला जात असे. किंबहुना तो गृहीतच होता. मुस्लिमधर्मीय मुलांना मुस्लिम धर्माचे शिक्षण आवश्यक होते. जोडीला फारसी व अरबी भाषांची खास व्यवस्था होती. हिंदू मुलांना नीतिशास्त्राच्या नावाखाली जे शिकविले जात होते त्यातही मुस्लिमधर्मीय पगडा राहील अशी काळजी घेतली जात होती. मुस्लिम धर्माभिमान महाविद्यालयीन मुलांच्या पोषाखापर्यंत घसरत आला होता. मुस्लिम पेहरावच गणवेष म्हणून सर्वधर्मीय मुलां-साठी सक्तीचा करण्यात आला होता. मुस्लिम अल्पसंख्य होते. परंतु शासनात आणि शासकीय नोकऱ्यांत त्यांचीच बहुसंख्या होती. मुस्लिम मनामध्ये प्रयत्नपूर्वक असे ठसविण्यात आले होते की, हैद्राबाद हे मुसल-मानांचे सार्वभौम राज्य असून ' अनल मलिक ' च्या सिद्धांताप्रमाणे या राज्यातील प्रत्येक मुसलमान राज्याचा भागीदार (मालक) आहे. हिंदू

प्रजेचे स्थान रय्यत म्हणजे शासित गुलाम असेच ओघाने आले. मेहेरबानी म्हणून काय जे मिळेल त्यात समाधान मानावयाचे. संपूर्ण राज्याची अवस्था आर्थिक, राजकीय आणि शैक्षणिकदृष्टचा अत्यंत मागासलेली होती. जिल्ह्याला फक्त एक हायस्कूल असावयाचे. इतर प्रांत आणि म्हैसूर, त्रावणकोर, बडोदा, यासारख्या संस्थानांच्या तुलनेत हैद्राबाद फारच खालच्या पातळीला उभे असणारे संस्थान होते. निजाम व्यक्तिशः जगातल्या श्रीमंत माणसांपैकी होता. परंतु त्याचे संस्थान भिकार अवस्थेत होते. राज्याची चार प्रकारची विभागणी होती. सर्फेखास (निजामाची व्यक्तिगत जाहगीर) पायगा, जाहगीर आणि खालसा या चारपैकी राज्याच्या मालकीच्या विभागाला खालसा संबोधीत. राज्याच्या एकूण क्षेत्रफळापैकी ४२ टक्के क्षेत्रफळ सर्फेखासचे होते. राज्यातील बहुतेक सुपीक भाग सर्फेखासमध्ये होते. या सर्फेखासच्या उत्पन्नाखेरीज राज्याच्या वार्षिक अंदाजपत्रकामधून निजामाला त्याच्या वैयक्तिक खर्चासाठी ५० लक्ष रुपये, निजाम व त्याचा लष्करी सचिव यांच्या प्रवासखर्चासाठी तसेच राजपुत्र व साहेबजादे व बेगमात यांच्या खर्चासाठी २.२० लक्ष, वऱ्हाडच्या एजंटांना ५५. ३९ लक्ष अशी कायम तरतूद होती.

राज्याच्या एकूण क्षेत्रफळापैकी खालसा ५८·५ टक्के, जाहगिरी-तहतचे क्षेत्रफळ १२ हजार चौरस मैलांचे होते. सरकारी नोकऱ्यांमध्ये मुस्लिमांचे प्रमाण ७५ टक्के तर हिंदूंचे २० टक्के. हैद्राबाद संस्थानाचे एकूण क्षेत्रफळ ८२६९८ चौरस मैल, लोकसंख्या १ कोटी ६३ लक्ष ३८ हजार ५३४. राज्यामध्ये १६ जिल्हे, चार सुभे, शंभर तालुके व २२५०० खेडी होती. खेड्यांपैकी ६ हजार खेडी जाहगिरीत मोडत असत. राज्या-मध्ये प्रामुख्याने तीन भाषांचे तीन प्रादेशिक विभाग होते. तेलगू भाषेचे तेलंगण (आठ जिल्हे) मराठी भाषेचा मराठवाडा (५ जिल्हे) आणि कन्नड भाषेचे कर्नाटक (३ जिल्हे). याखेरीज उर्दू भाषा ही राज्याची चौथी भाषा होती. भाषिक लोकसंख्या तेलगू ७५ लक्ष २९ हजार २२९, मराठी ३९ लक्ष ४७ हजार ८९, कन्नड १७ लक्ष २४ हजार १८० आणि उर्दू २१ लक्ष ८७ हजार ५. धर्मवार लोकसंख्या हिंदू १

कोटी ३३ लक्ष ९६४९, मुस्लिम २० लक्ष ९७ हजार ४७५, ख्रिस्ती २ लक्ष २० हजार ४६४ आणि इतर ७ लक्ष १० हजार ९४६.

हैद्राबाद संस्थान सर्व देशामध्ये औद्योगिकदृष्टचा अत्यंत मागासलेले संस्थान होते. मुद्रण, भाषण, लेखन, संघटन यांपैकी कुठलेच स्वातंत्र्य तेथे नव्हते. लोकशाहीच्या अत्यंत प्राथमिक व्यवहाराचा-देखील राज्याच्या कारभाराला स्पर्श झालेला नव्हता. तरी निजाम आणि त्याचे हस्तक असा दावा करीत की, हैद्राबाद हे भारतातील सर्वात मोठे, सधन, उत्तम रीतीने प्रशासित असे राज्य आहे. निजामाने शेवटी शेवटी म्हणजे फाळणी होऊन स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपण स्वतंत्र व सार्वभौम आहो असा पुकारा केला होता. पाकिस्तानची व त्याचे संस्थापक स्व. जीना यांची मदत घ्यावी व आपले स्वतंत्र राष्ट्र, मुस्लिम धर्मराज्य, म्हणून भारताच्या उदरस्थानी विकसित करावे असा त्याने प्रयत्न केला. त्यासाठी कोटचवधी रुपये उधळले.

राज्याच्या उत्पन्नाचा फार मोठा भाग लष्कर, पोलिस यावर आणि लष्करी तयारीवर खर्च केला. रझाकार संघटनेलाही हैद्राबाद सरकारने पैसा पुरविला. हा पैसा तथाकथित मुस्लिम निर्वासितांच्या पुनर्वसनाच्या नावावर रझाकारांना दिला जात असे. परदेशांमध्ये हैद्राबादच्या प्रचारासाठी व विशेषत: शस्त्रास्त्रे चोरूनमारून आयात करण्यासाठी कित्येक हजार पौन्ड परदेशात खर्च करण्यात आले. काही परकीय नागरिकांना फार मोठ्या रकमा यासाठी देण्यात आल्या की, त्यांनी हैद्राबादला शस्त्रास्त्रे, लष्करी साहित्य मिळवून द्यावे व हैद्राबादचे सागरी व हवाई तळ म्हणून गोव्याचा वापर करण्यासाठी पोर्तुगीज सरकारशी वाटाघाटी कराव्यात.

आज हैद्राबादसह सर्व संस्थाने भारतीय संघराज्यात विलीन झाल्यानंतर संस्थानी समस्येचे व हैद्राबादच्या विलीनीकरणाचे विशेष काही न वाटणे स्वाभाविक असले तरी ते वास्तव ठरत नाही. हैद्राबादच्या समस्येची दुर्धर व नागमोडी वळणे लक्षात येण्यासाठी त्याचे व त्याच्या राज्यकर्त्यांचे अंतरंग समजून घेणे आवश्यक आहे. स्वामी

रामानंद तीर्थांनी ज्या स्वातंत्र्यासाठी आपले सर्वस्व पणाला लावले त्याचे मोल मगच लक्षात येण्याची शक्यता आहे.

निजामाला जीनांची फूस होती असे म्हणण्यापेक्षा निजामानेही फार चपखलपणे जीना आणि मुस्लिम लीग यांचा आपल्या अस्तित्वा-साठी उपयोग करून घेतला होता, असे म्हणणे अधिक उचित ठरेल. त्याने जीनांचा वारंवार सल्ला घेतला, एवढेच नव्हे तर भारत सरकारला अशी लेखी धमकीही दिली होती की, भारत सरकारने निजामाशी त्याच्या म्हणण्याप्रमाणे करार केला नाही तर निजाम पाकिस्तानशी करार करील व त्यात सामील होईल. १ डिसेंबर १९४७ ला लायकअली हैद्राबादचा पंतप्रधान होण्यापूर्वी पाकिस्तानचे अर्थमंत्री गुलाम महंमद यांना निजामाने पाचारण केले होते. त्यांनी पंतप्रधान होण्यास नकार दिल्यानंतरच लायकअली त्या पदावर नेमला गेला. हा लायकअली गुप्तपणे पाकिस्तानात जाऊन जीनांशी गुफ्तगू करून आला होता. हैद्राबादसाठी पाकिस्तानकडून अथवा त्याच्यामार्फत शस्त्रास्त्रे मिळवि-ण्याचा त्याचा उद्देश होता. निजामाने भारत सरकारला न विचारता फाळणी होताच पाकिस्तानला २० कोटींचे कर्ज दिले होते. निजामाने संयुक्त राष्ट्र संघटनेकडे एक शिष्टमंडळही भारताच्या विरुद्ध पाठविले होते. त्याचे नेते नबाब मोईन नवाज जंग पॅरिसला जाताना १० सप्टेंबर १९४८ रोजी कराचीत उतरले. ११ च्या सकाळी ते पाकिस्तानच्या राजधानीत दाखल झाले आणि त्याच रात्री कायदे आजम जीना यांचे देहावसान झाले. त्याच्या दोन दिवसांनंतर १३ सप्टेंबरला पोलिस ॲक्शन झाले. अखेरच्या क्षणापर्यंत निजामाची कशी धडपड चालू होती याची या काही घटनांवरून कल्पना येते.

निजाम कधी स्वतः होऊन तर कधी रझाकार व इत्तेहादुल मुस्लिमीन यांचा आश्रय घेऊन भारत सरकारला चाळवण्या देत होता. जैसे थे करारही त्याने अत्यंत मिन्नतवारीने केला. परंतु तो करार पाळ-ण्याऐवजी त्याने सदैव त्याचा भंगच केला. रझवी हा इत्तेहादचा अध्यक्ष होता. त्याने राज्यभर दोन लाख प्रशिक्षित सैनिकांची पलटण तयार केली होती. प्रत्येक खेड्यात रझाकार संघटनेची शाखा होती. लष्करी

शिक्षण देऊन पाच लाख रझाकार तयार करण्याची त्याचा संकल्प होता. त्याने भारत सरकारला वारंवार धमक्या दिल्या होत्या व दिल्लीवर ' परचमे आसफिया ' – आसफजाही घराण्याचा ध्वज फडकविण्याची घोषणा केली होती. आपण सार्वभौम आहो व पुढेही तसेच असू हे भारत सरकारवर बिंबवण्यासाठी त्याने अशीही धमकी दिली होती की, भारताने पुढे मागे ब्रिटिश राष्ट्रकुटुंबातून बाहेर पडण्याचे ठरविले तर हैद्राबादला ब्रिटिश राष्ट्रकुटुंबात राहण्याचे स्वातंत्र्य असेल आणि भारत व पाकिस्तान यांच्या दरम्यान युद्ध उद्भवले तर हैद्राबाद तटस्थ राहील.

निजाम आणि इत्तेहादुल मुस्लिमीनचा अध्यक्ष कासिम रझवी जवळ जवळ एकसारखीच भाषा वापरीत होते. लाल किल्ल्यावर आसफिया ध्वज फडकवू, बंगालच्या उपसागराच्या लाटा निजामाच्या पाद-स्पर्शासाठी हैद्राबादी येतील, हैद्राबाद हे भारतातील मुस्लिमांचे स्वतंत्र सार्वभौम राज्य आहे. भारत सरकार जर हे सर्व विसरून हैद्राबादेत आलेच तर तेथील म्हणजे हैद्राबादेतील दीड कोटी हिंदूंची राख झालेली बघावी लागेल. भारतात जे मुस्लिम उरले आहेत ते हैद्राबादवर भारताने हल्ला केला तर हात जोडून स्वस्थ बसणार नाहीत. या सर्व वल्गना आता इतिहासजमा झाल्या असल्या तरी त्या काळी त्यांनी बराच उत्पात घडवून आणला होता.

निजाम आणि रझवी यांची सारी भिस्त भारतातील जातीय-वादी शक्तींवर, पाकिस्तान आपल्या मदतीला धावून येईल यावर आणि दोन लाख सशस्त्र रझाकार व सरसेनानी एल. इद्रूस यांच्या सेनापतित्वाखाली असलेल्या ४२ हजार खड्या सैन्यावर होती. निजा-माने आतापावेतो शस्त्रास्त्र खरेदीवर २२ कोटी रुपये खर्च करून टाकले होते व वातावरणात अशा अफवा मुद्दामच पसरविण्यात आल्या होत्या व तसा बुद्धिपुरस्सर प्रचारही करण्यात आला होता की, निजामाचे लढाऊ हवाई विमानदळ प्रसंग पडलाच तर मुंबई, मद्रास, कलकत्ता आणि जमले तर दिल्ली या शहरांवर बाँबफेक करून ती बेचिराख करून टाकील.

स्वामी रामानंद तीर्थांनी अवघ्या दहा वर्षांच्या अल्पावधीत हैद्राबाद

संस्थान बरखास्त करून ते भारतीय संघराज्यात नेहमीसाठी विलीन करण्याचे जे ऐतिहासिक कार्य केले त्याची पार्श्वभूमी वरील माहितीच्या प्रकाशात लक्षात येईल. या लढयात स्वामीजींच्या धर्मनिरपेक्षतेची सत्त्वपरीक्षाच झाली. बहुसंख्य जनता हिंदू होती. तिला कसल्याही प्रकारचे अधिकार नव्हते. धार्मिक स्वातंत्र्यही नव्हते. अशा स्थितीत हैद्राबाद संस्थानात हिंदू जातीयवादी शक्ती व त्यांच्या संघटना वाढल्या असत्या तर ते स्वाभाविक ठरले असते. आरंभी म्हणजे १९३८ मध्ये व त्या आधी हिंदुसभा, हिंदू लीग, आर्य समाज या संस्थांनी पुष्कळ प्रयत्न करून बघितले. हिंदू मुस्लिमांचे दंगेही भरपूर झाले. मुस्लिम जातीय-वाद्यांना त्यांच्या प्रतिक्रियेमधून हिंदू जातीयवाद वाढला तर हवाच होता. परंतु हैद्राबादचा इतिहास काही निराळीच साक्ष देतो. हिंदू जातीयवादी संघटना व शक्ती तेथे नगण्य ठरल्या. लोकांनी मुस्लिम जातीयवादाचा मुकाबला व्यापक राष्ट्रवादी भूमिकेवरून केला. हैद्रा-बादची स्वातंत्र्यवादी चळवळ अखेरपर्यंत राष्ट्रवादी व धर्मनिरपेक्ष राहिली. याचे फार मोठे श्रेय स्वामीजींच्या नेतृत्वाला द्यावे लागेल. स्वामीजी व शेख अब्दुल्ला यांच्यातील साम्य, विरोध याच संदर्भात लक्षात घेण्यासारखे आहेत.

सातवा निजाम मीर उस्मान अली खान २९ ऑगस्ट १९११ ला गादीवर आल्यावर १९१८ मध्ये ब्रिटिश सरकारने त्याला HEH ही बिरुदावली वंशपरंपरागत प्रावीण्य म्हणून बहाल केली. यानंतर थोडयाच अवधीत निजामाला इंग्लंडच्या राजाकडून ' फेथफुल अलाय ' ही पदवी मिळाली. हैद्राबादच्या गुलामीवृत्तीचा हा गौरव होता. स्वदेशाशी दगलबाजी करून निजामाने इंग्रजी सत्तेची सेवा केली त्याची ही बक्षिसी होती. त्याच निजामाने आपल्या सार्वभौमत्वाचा व अधिसत्तेचा बागुलबुवा उभा करून काही दिवस का होईना भारतीय स्वातंत्र्याचे पूर्णत्व स्थगित केले.

निजामाची म्हणजे आसफजाही घराण्याची सत्ता १७७२ ते १९४८ पर्यंत म्हणजे २३६ वर्षे भारताच्या नाभिस्थानी टिकली. १९४८ साली भारत सरकारला शरण आलेला मीर उस्मान अली याने

१९११ ते १९४८ पर्यंत म्हणजे ३७ वर्षं राज्य केले. पहिला आसफजाह कमरुद्दीन (याचा काळ १७१२ ते १७४८ असा आहे.) त्यानेच १७२४ मध्ये आसफजाही सल्तनतीची व गादीची स्थापना केली. दुसरा आसफजाह निजाम अली (१७६१ ते १८०३), तिसरा सिकंदर जाह बहादुर (१८०३ ते १८२९), चौथा नासिरुदौला वहादुर (१८२९ ते १८५७), पाचवा अफजलुदौला वहादुर (१८५७ ते १८६९), सहावा मीर महबूब अली खान (१८६९ ते १९११) आणि सातवा उस्मान अली. इंग्रजांपुरता विचार केला तरी हैद्राबादचा निजाम सदैव इंग्रजी सत्तेचा ताबेदार व निष्ठावंत मांडलिक म्हणूनच वागला. हैद्राबादच्या अंतर्गत कारभारात भारताच्या केंद्रीय सत्तेने सर्व प्रकारे हस्तक्षेप केल्याचे असंख्य पुरावे गतेतिहासाच्या पानोपानी विखुरलेले आहेत असे दिसते. मुलुख काढून घेणे, पंतप्रधान नेमणे व काढून टाकणे, फौज ठेवणे, लष्कराचा ताबा ठेवणे, राज्यावर देखरेख ठेवण्यासाठी राज्यात कायम रेसिडेंट नेमणे व त्याच्यामार्फत निजामाचे व त्याच्या सत्तेचे वेळोवेळी नियमन करणे आदी गोष्टी इग्रजांनी अनेकदा केलेल्या आहेत. इतर सर्व संस्थानांच्या तुलनेत निजाम हा इंग्रजांशी अधिक स्वामीनिष्ठ होता असे फार तर म्हणता येईल.

स्वामी रामानंद तीर्थांच्या वाट्याला इतिहासाने असा चक्रव्यूह भेदण्याचे काम दिले होते. अतिरेकी शक्ती वाढू न देता भारतीय स्वातंत्र्याच्या मागे ज्या उच्चतर प्रेरणा होत्या व ज्या महनीय मूल्यांचे अधिष्ठान होते, त्याची शुद्धता स्वामीजींनी प्राणपणाने राखली व भारतीय स्वातंत्र्याची अखेरची लढाई जिंकून आपल्या स्वातंत्र्याला पूर्णत्व आणले. एका फकिराने दिलेला संकेत एका संन्याशाच्या हातून तडीस गेला. या संन्याशाच्या जीवनात डोकावून पाहाणे व त्याच्या बुद्धीची, मनाची आणि विचारप्रवृत्तीची वाढ कसकशी झाली हे बघणे उद्‌बोधक ठरेल.

# २

# जन्म, बालपण व शिक्षण

हैद्राबादसारख्या अत्यंत कठीण व गुंतागुंतीच्या संस्थानाची ज्या स्वामीजींनी दुहेरी पारतंत्र्यातून मुक्तता केली त्यांचे जीवन अनेक असाधारण व अपवादात्मक गोष्टींनी भरलेले आढळते. अगदी त्यांच्या जन्मापासूनच सुरुवात करता येईल.

स्वामीजींचे जन्मगाव सरकारी कागदपत्रांनुसार निजामी संस्थानातील गुलबर्गा जिल्ह्यातील चिनमेल्ली हे आहे. चिनमेल्ली हे जाहगिरीचे गाव आहे. परंतु वस्तुस्थिती काही निराळीच आहे. स्वामीजींचा जन्म विजापूर (कर्नाटक) जिल्ह्यातील सिंदगी या तालुक्याच्या गावी सन १९०३ मध्ये झाला. परंतु झाले असे की, स्वामीजी जेव्हा संस्थानातील राजकारणात सक्रियपणे भाग घेऊ लागले तेव्हा त्यांना गैरमुलकी (संस्थानाबाहेरचे) म्हणून संस्थानाबाहेर घालवून देण्याचे निजाम सरकारने ठरविले. ही आपत्ती टळावी म्हणून स्वामीजींनी आपले जन्मगाव चिनमेल्ली असल्याचे सांगितले. एवढेच नव्हे तर त्या गावच्या जन्म–मृत्यू नोंदणी रजिस्टरमध्ये तशी नोंदही करण्यात आली. या गावचे जाहगीरदार स्वामीजींविषयी आदर बाळगून होते व त्यांच्या राजकारणाचे पुरस्कर्ते होते. स्वामीजींच्या सांगण्यावरून पोलिसांनी चौकशी केली तेव्हा स्वामीजींचा जन्म चिनमेल्ली येथे झाल्याची नोंदच मिळाली. यामुळे त्यांना परकीय ठरवून संस्थानाबाहेर घालवून देणे अशक्य झाले.

आणखी एक अशीच अपवादात्मक गोष्ट स्वामीजींच्या आयुष्यात घडून आली असून तिचा त्यांच्या संपूर्ण जीवनावर फार खोलवर परिणाम झालेला आढळतो. स्वामीजींचे वडील भवानराव खेडगीकर हे त्या काळचे व्हर्नाक्युलर फायनल (सातवी) झालेले होते व ते तेव्हाच्या कर्नाटकात सिंदगी या गावच्या कानडी प्राथमिक शाळेत बरीच वर्षे मुख्याध्यापक म्हणून काम करीत होते. तसे स्वामीजींचे मूळ घराणे खेडगी या गावचे. खेडगी हे विजापूर जिल्ह्यात हुंडी या तालुक्यात असून स्वामीजी मूलतः कानडी भाषिक आहेत. प्राथमिक शाळेच्या मुख्याध्यापकाची आर्थिक स्थिती बेताची किंबहुना ओढागस्तीची असणार हे मुद्दाम सांगण्याचे कारण नाही. भवानराव आरंभापासूनच एक विरक्त वृत्तीचे गृहस्थ होते. वेदांत आणि अध्यात्माच्या क्षेत्रात त्यांचा विपुल व्यासंग होता. ते सदैव त्यातच मग्न असत. शेवटी दोन मुली झाल्यावर त्यांनी चक्क संन्यास घेतला व ते घर सोडून निघून गेले. स्वामीजींच्या वडिलांनी ज्यांना गुरू केले त्यांना नंतर असे समजले की, भवानराव हे विवाहित व कुटुंबवत्सल गृहस्थ आहेत. त्यांनी भवानरावांना परत गृहस्थाश्रम स्वीकारण्याचा उपदेश केला. अशा रीतीने भवानराव परत प्रपंचाला लागले. त्यानंतर स्वामीजींचा जन्म झाला. स्वामीजींनी आपण्या आठवणीमध्येच या घटनेचा उल्लेख केला आहे. मराठी संतपरंपरेचे संस्थापक संत ज्ञानेश्वर व त्यांची भावंडे ही जशी संन्याशाचीच अपत्ये होती, त्याचप्रमाणे स्वामीजी व त्यांची भावंडे संन्याशाच्याच पोटी जन्माला आली. रुळलेल्या चाकोरीपेक्षा निराळीच अशी ही घटना आहे.

स्वतः स्वामीजींनी म्हटले आहे की, त्यांच्या वडिलांची एकूण प्रवृत्तीच संन्याशाची असल्याने त्यांच्या विरक्तीचाच ठसा त्यांच्या मनावर उमटला. त्यांच्या वडिलांनीच स्वामीजी लहान असताना आपली मनीषा त्यांच्यापाशी व्यक्त केली व त्यांनी संसार न करता संन्यास घेऊन विश्वाचा संसार करावा असे सांगितले. बालपणापासूनचे जे संस्कार व जे विचार पुढील आयुष्यात त्यांच्या मनःपिंडाबरोबर वाढले त्यात हा संन्यास ग्रहण करण्याचा विचार होता. कालांतराने

त्याचीच परिणती एका अनावर ओढीत झाली. साधू संन्याशी, बैरागी, निर्जन नदीकाठ, गिरिकुहरे आणि लौकिकापासून दूर असणारी गिरिकंदरे यांचे एक विलक्षण आकर्षण त्यांना लहानपणापासूनच वाटू लागले. ते संन्यासी झाले त्याचे मूळ त्यांच्या या प्राथमिक संस्कारात शोधता येते.

स्वामीजी आरंभी म्हटल्याप्रमाणे मूळ खेडगी या गावचे. त्यांचे मूळ नाव व्यंकटेश भवानराव खेडगीकर असे. भवानराव यांना आणखी तीन भाऊ होते. त्यांपैकी दोघे उदरनिर्वाहासाठी महाराष्ट्रात आले. खेडगी हे विजापूर जिल्ह्यात भीमा नदीच्या काठावरचे गाव आहे. भीमा नदी महाराष्ट्र आणि कर्नाटक या दोन राज्यांच्या दरम्यान सरहद्दी-वरून वाहते. दोन्ही भाग लागून असल्यामुळे खेडगीकर घराणे मूळ कन्नड भाषिक असले तरी त्यांचा मराठीचाही तेवढाच परिपाठ होता. स्वामीजींचे जे दोन चुलते महाराष्ट्रात आले त्यांपैकी रामभाऊ खेडगीकर हे जी. आय. पी. रेल्वेमध्ये नोकरीला लागले आणि पुढे तेच रेल्वे कामगारांचे थोर नेते म्हणून प्रसिद्धी पावले. खेडगीकर हे खेडगी या गावचे वतनदार कुलकर्णी. स्वामीजींच्या मोठ्या भावाच्या हयाती-पर्यंत हे कुलकर्णीपण चालू होते. तथापि खेडगीकरांचे वडिलोपार्जित घर व थोडीशी शेती सिंदगी या गावीच होती.

स्वामीजींच्या वडिलांना म्हणजे भवानराव खेडगीकर यांना चार मुली व तीन मुले एवढी अपत्ये होती. पैकी भावांमध्ये स्वाजींचो दुसरे.

स्वामीजींचा हैद्राबाद संस्थानाशी लहानपणापासूनच संपर्क आला त्याचे मुख्य कारण असे की, त्यांच्या दोन मोठ्या भगिनी हैद्राबाद संस्थानातच दिल्या होत्या. त्यांच्या वडिलांनीच ही लग्ने लावून दिली होती. सर्वात मोठी बहीण सुप्रसिद्ध दत्तात्रयाचे क्षेत्र जे गाणगापूर येथील पुजाऱ्यालाच दिली होती तर दुसरी सुरपूर येथील एका वकिलाला दिली होती. स्वामीजोंचा आपल्या या दोन बहिणींच्यामुळे मोगलाईशी प्रथम संबंध आला. गाणगापुरी संगमाचा परिसर अक्षरशः भारून टाकणारा व निसर्गाच्या नयनमनोहर परिवेषांनी नटलेला प्रदेश आहे. स्वामीजी आपल्या बहिणीकडे वारंवार येत त्याचे कारण हा रम्य

परिसरच. काळ अगम्य आणि भविष्य अज्ञात असते हे खरे परंतु काही व्यक्तींच्या बाबतीत काळ आधीपासूनच काही योजना ठरवून ठेवत असावा असे दिसते. अन्यथा स्वामीजींचा हैद्राबाद संस्थानाशी जो संबंध आला त्याची संगतीच लावता येत नाही. जणू नियोजित भविष्यानेच स्वामीजींचा संपूर्ण वर्तमानकाळ बोटाशी धरून चालवीत नेला.

स्वामीजींचे प्राथमिक शिक्षण सिंदगी येथे त्यांचे वडील ज्या शाळेत मुख्याध्यापक होते त्याच शाळेत झाले. दुसऱ्या वर्गात असताना घडलेला एक प्रसंग त्यांनीच आपल्या आठवणीत नमूद केला आहे, संन्यास घेण्याच्या आधीच्या व्यंकटेशला साधू, संन्याशी व नदीनाले यांचे फार आकर्षण होते, हे आरंभी नमूद केलेच आहे. छोटा व्यंकटेश शाळेला जाता येतानाच नव्हे तर अन्य वेळीही जेथे साधू-बैरागी उतरत तेथे मुद्दाम जात असे, एक अनामिक ओढच त्याला तिकडे नेत असे. एके दिवशी असाच एक संन्याशी नदीच्या काठावर धुनी लावून ध्यानस्थ बसला होता. त्याच्या डोळ्यांवाटे अश्रू ओघळत होते. व्यंकटेश नकळत त्या साधूच्या जवळ जाऊन उभा राहिला. बराच वेळ झाला. अंधार पडला. आकाशात तारे तुरळक लुकलुकू लागले, व्यंकटेशला रात्र झाल्याचे लक्षातच आले नाही. साधूचे ध्यान विसर्जित झाले व तो आसनावरून उठला तेव्हा तेथेच उभा असलेला व्यंकटेश त्याच्या पाया-वर पडला. त्याने लोटांगणच घेतले. साधूने मुलाला उचलले. मुला तू इथे का व कसा आलास ? तुला काय हवे आहे ? साधूच्या प्रश्नाला व्यंकटेशने मौनानेच उत्तर दिले. शेवटी साधू जायला निघाला तेव्हा पुन्हा म्हणाला की, बाळ तुझ्यासाठी मी काय करू सांग ना. इतका वेळ स्तब्ध असलेला व्यंकटेश साधूचे मुख न्याहाळीत म्हणाला, साधू महाराज, मला तुमच्यासारखे संन्यासी व्हावयाचे आहे. मला त्यासाठी तुम्ही मदत कराल काय ? साधू बिचारा काय बोलणार ? जाता जाता मुलाच्या मस्तकावर हात ठेवून "तथास्तु" म्हणाला. स्वामीजी आपल्या गतकाळाच्या आठवणींना उजाळा देतात तेव्हा हा प्रसंग त्यांच्यासमोर हटकून उभा राहतो. अज्ञात भविष्याची आखणी होत नसते हे जरी खरे असले तरी असल्या छोट्या–मोठ्या प्रसंगांची पुढे चालून भूत आणि

भविष्याच्या वाटचालीशी कुठेतरी संगती जोडली जाते. अज्ञाताच्या या पाऊलखुणा स्वामीजींना तरी वारंवार दिसत गेल्या असाव्यात असे त्यांच्या जीवनाकडे बघितले म्हणजे वाटते.

व्यंकटेशच्या बालमनावर परंपरागत श्रद्धा आणि वडिलापासून चालत आलेली विरक्ती यांचा नकळत सुसंस्कार घडत असतानाच एक बंडखोर मन व्यंकटेशच्या व्यक्तित्वात आकार धारण करीत होते. हे कळण्याइतके ते वय नव्हते. परंतु उपजतच काही गोष्टींविषयी व्यंकटेशला जसे आकर्षण होते तसाच काही गोष्टींच्या बाबतीत तिरस्कार व विरोधही होता. खेडगीकरांचे घराणे तप्त मुद्रा घेणाऱ्या कडव्या वैष्णवांचे. ते धार्मिक निष्ठेच्या संदर्भात माध्व घराणे होते. उत्तराधि-मठाचे मध्वाचार्य एकदा असेच सोलापुरी आले होते, व्यंकटेश तेव्हा सिंदगी सोडून सोलापुरी शिकायला आला होता. 'मध्वाचार्यां' कडून तप्तमुद्रा धारण करून पावन होण्याचा तेव्हा वैष्णवात प्रघात होता. व्यंकटेश जेथे राहत असे त्या घरातील सर्वांनी तप्तमुद्रा घेण्याचे ठरविले. व्यंकटेशवरही सक्ती झाली. तप्तमुद्रा म्हणजे काय वगैरे समजण्याचे ते वय नव्हते तथापि व्यंकटेशला मनोमन काही तरी वाटले व त्याने घरच्या मंडळींना ठामपणे सांगून टाकले की, मला जबरदस्तीने स्वामी-पुढे नेले तर मी त्यांना स्पष्टपणे सांगेन की, तप्तमुद्रा घेण्याची माझी इच्छा नाही. मी त्या कदापि घेणार नाही. विरक्त आणि संन्यस्त जीवनाविषयी ओढ, मात्र कर्मकांडाविषयीची चीड व्यंकटेशाच्या बाल-मनात रुजत चालली होती हेच या घटनेवरून दिसते.

सिंदगी सोडून व्यंकटेश सोलापूरला आला व हायस्कूलपर्यंतचे शिक्षण त्याने तेथेच नॉर्थकोट हायस्कूलमध्येच पूर्ण केले. नॉर्थकोट हाय-स्कूल हे सरकारी हायस्कूल होते. परिस्थिती हलाखीची असल्याने व्यंकटेशने नॉर्थकोट हायस्कूलच्या वसतिगृहात वाढण्याचे काम पत्करले. त्या मोबदल्यात वसतिगृहात राहण्याची व शाळेची फी वगैरेची सोय झाली. येथेच नवनवे मित्र मिळाले. पुस्तकांचा सहवास लाभला. व्यंकटेशाला या काळातच स्वामी विवेकानंद व स्वामी रामतीर्थ यांची पुस्तके वाचायला मिळाली. शाळेव्यतिरिक्त ज्ञानाचे जे अतिविशाल

विश्व आहे. त्याचे छोटेसे दर्शन पुस्तकांच्या गवाक्षातून व्यंकटेशने घेण्यास प्रारंभ केला.

पहिल्या महायुद्धाचा काळ होता. नॉर्थकोट हायस्कूल सरकारी असल्याने तेथे सरकारी कार्यक्रमांची सक्ती होती. युद्धात दोस्तांचा सतत जय होत असून जर्मनी व कैसर हे क्रूरकर्मा आहेत अशा गोष्टी सातत्याने मुलांच्या कानांवर घातल्या जात. सोलापूरचा कलेक्टर दर आठवड्याला शाळेला भेट देत असे व युद्धाचा दोस्तांना अनुकूल असा प्रचार करीत असे. मुलांना सरकारी कर्जरोखेही सक्तीने विकले गेले. व्यंकटेशला त्याच्या गरिबीने या आपत्तीतून वाचविले. परंतु या काळी वाढत्या वयाच्या बरोबरच व्यंकटेशाच्या मनावर बाहेरच्या अनेक गोष्टींचा प्रभाव पडत होता व प्रस्थापित सत्तेच्या विरोधात बंडखोरी वाढत होती. छोटया गोष्टीतून ती प्रगट होत असे. मुलांना यूनियन जॅकचे छोटे झेंडे व त्याबरोबर खाऊचे पुडे दिले गेले. व्यंकटेशासारख्या उगवत्या बंडखोरांनी यूनियन जॅक फेकून देणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या वाढविली. दुसरे दिवशी अशा सर्व विद्यार्थ्यांना इंग्रजधार्जिण्या मुख्याध्यापकाच्या छडया खाव्या लागल्या.

लोकमान्य टिळकांचे सोलापुरातील आगमन ही घटना व्यंकटेशसारख्या हायस्कूलमधील मुलांपासून मोठ्या प्रौढापर्यंत अनेकांच्या मनावर देशभक्तीचा व स्वातंत्र्यासाठी काही तरी करण्याच्या भावनेचा गडद ठसा उमटवून गेली. टिळक येणार. त्यांच्या स्वागतासाठी कोणीही स्टेशनवर जाऊ नका असा मुख्याध्यापकांनी फतवा काढला, तरीही व्यंकटेश व त्याचे मित्र आपल्या नेत्याचे दुरून दर्शन घेऊन आलेच. गावात लोकमान्यांची सभा ठरली होती. तेथे कोणी जाऊ नये अशी ताकीद देण्यात आली होती. खेरीज जाणारावर पाळत ठेवण्यात आली होती. दिवस वार्षिक परीक्षेचे होते. सायन्सचा पेपर वेळ बदलून अशा वेळी ठेवला होता की, मुलांना लोकमान्यांच्या सभेला जाता येऊ नये. परंतु मुले गेलीच. पेपर लवकर सोडवून मुलांनी लोकमान्यांची सभा गाठलीच. अर्थातच या राजद्रोहाबद्दल छोटया-मोठया

शिक्षा झाल्या. देशभक्ती आणि स्वातंत्र्य यांचे बीज याच काळात रुजत गेले.

मॉंटफोर्ड सुधारणा जाहीर झाल्या. सर्वत्र चर्चा सुरू झाली. इंग्रजांनी आपली फसवणूक चालविली आहे, स्वराज्य देण्याची टाळा-टाळ चालू आहे. सुखासुखी स्वराज्य मिळण्याची शक्यता नाही. काही तरी भव्यदिव्य केले पाहिजे असे व्यंकटेशला वाटू लागले. याच सुमारास लोकमान्य टिळक व ॲनी बेझंट यांच्या होमरुल लीगचे नाव कानावर आदळू लागले. कळत फारसे नव्हते, परंतु टिळक आणि त्यांचे अनुयायी जहाल आहेत, काही तरी पुरुषार्थ करून दाखवावा असे या गटाचे म्हणणे आहे व प्रागतिक अथवा नेमस्त म्हणविणारे त्यांना विरोध करीत आहेत, हे नेमस्त इंग्रजधार्जिणे आहेत अशी स्थूल जाणीव पेटत्या परिस्थितीच्या माध्यमातून शाळकरी मुलांच्या मनात निर्माण होऊ लागली. याच काळात सोलापुरी जोसेफ बाप्टिस्टा यांच्या अध्यक्षते-खाली मुंबई प्रांतिक परिषदेचे अधिवेशन झाले. त्यात मॉंटफोर्ड सुधारणा राबवाव्यात असे म्हणणाऱ्या प्रागतिकांचा जहालांनी धुव्वा उडविला. मॅट्रिकच्या वर्गात असणाऱ्या व्यंकटेशला या गोष्टी बरेच काही सांगून गेल्या. एक कमालीची अस्वस्थता वाढली. पुस्तकांत मन रमेना. विरक्तीची भावना वरचढ होऊ लागली. सर्व फेकून देऊन मैदानात उतरावे आणि इंग्रजांचे राज्य संपुष्टात आणावे, स्वातंत्र्याच्या सूर्याला आपल्या आयुष्याचे, आपल्या सौख्याचे अर्घ्य द्यावेत आणि जीवनाचे सोने करावे असे वाटू लागले. परंतु ही खदखद आतले आतच होती. तोच लोकमान्यांचे मुंबईला देहावसान झाल्याचे वृत्त सर्वत्र पसरले. व्यंकटेश नुसताच अस्वस्थ नव्हता तर त्याचा आत्मा काही तरी प्रत्यक्षात करण्यासाठी तडफडत होता. या अवस्थेची तीव्रता लोकमान्यांच्या मृत्यूने वाढविली. लोकमान्य गेले आणि आपण काय नुसतेच शाळेत शिकत बसणार ? विवेकानंद व रामतीर्थ वाचून आपण काय शिकलो ? असे असंख्य प्रश्न सतावू लागले. याच स्थितीत व्यंकटेशने दिवसभर उपवास केला. अस्तमानी तो तळ्याच्या काठी एकांतात जाऊन बसला. स्वामीजींनी आपल्या आठवणींच्या संग्रहात या घटनेचे वर्णन पुढील-प्रमाणे केले आहे.

'मी तळ्याच्या पायऱ्यांवर बसलो. तळ्याचे पाणी पायऱ्यांपर्यंत होते. मी खूप खूप रडलो. किती वेळ ते आठवत नाही. बाहेरच्या जगाचा मला बहुतेक विसर पडला होता. मी अगदी शून्यमनस्क बसलो. न कोणता विचार न कसली जाणीव. संध्याकाळ झाली. सूर्य अस्तास चालला होता. एकदम मी उभा राहिलो. दोन्ही हातांच्या ओंजळीत तळ्याचे पाणी घेतले. आणि मावळत्या सूर्यास मी अर्घ्य दिले. ते देताना मी स्वत शीच पुटपुटलो, 'या क्षणापासून माझे पुढील जीवन मी पूर्णपणे मातृभूमीच्या सेवेसाठी अर्पण करीन. सर्वसंग परित्याग करून आजन्म ब्रह्मचारी राहीन.' मी अर्घ्य दिले अन् ध्यानमग्न झालो. तेव्हापासून पुढे जीवनप्रवाहच बदलला.

येथून पुढचा काळ नावापुरते शिक्षण व प्रामुख्याने देशभक्ती यातच गेला. व्यंकटेश, हायस्कुलातील एक चांगला विद्यार्थी होता. त्याने उत्तम विद्याभ्यास करावा व राजद्रोहाकडे वळू नये असे त्याला त्याच्या शिक्षकांनी परोपरीने सांगितले, परंतु व्यंकटेशची पावले आता परत वळायला तयार नव्हती. भरमसाट वाचन चालू होते. गांधीजी एकदा असेच सोलापुराहून गेले. व्यंकटेश स्टेशनवर त्यांना बघायला गेला. कृश शरीरयष्टीचा हा मुलगा स्टेशनवरच्या बेफाम गर्दीने कुठले कुठे रेटीत नेला. परंतु योगायोग असा की, गांधीजींना घेऊन गाडी स्टेशनात आली व व्यंकटेशच्या समोरच गांधीजींचा डबा थांबला. आपण धन्य झालो या भावनेने व्यंकटेशने गांधीजींच्या पायांना स्पर्श करून दर्शन घेतले. गांधीजींनी मुलाचे खांदे धरले. त्याला उठवले. हिंदीत म्हणाले, 'देशासाठी काहीतरी करा.' हाच व्यंकटेश पुढे हैद्राबादच्या स्वातंत्र्य आंदोलनाचा नेता झाला व गांधीजींच्या नजिकच्या परिवारातला म्हणून गांधीजींकडून सत्याग्रहाचे आदेश घेऊ लागला. वैयक्तिक सत्याग्रहासाठी गांधीजींनी हैद्राबाद संस्थानात ज्या पाच-सात जणांची निवड केली त्यांत पुढे स्वामी रामानंद तीर्थ या नावाने प्रसिद्धीस आलेला व्यंकटेश पहिल्या क्रमांकाला होता.

गांधीजींचे हे दर्शन झाल्यानंतर व्यंकटेशने व त्याच्या मित्रांनी आपल्या शाळेत तीनशे-चारशे विद्यार्थ्यांची एक संघटना उभारली.

निरनिराळ्या विषयांवर चर्चा करावयाची, थोर देशभक्तांची चरित्रे वाचावयाची असे कार्यक्रम या संघामार्फत होऊ लागले. एकदा या विद्यार्थ्यांनी पुण्याहून काँग्रेसचे पुढारी म्हणून नरसिंह चिंतामण केळकर यांना बोलावले. केळकरांचे भाषण झाले. शेवटी व्यंकटेश बोलला. तो इतकेच म्हणाला की, 'पारतंत्र्यात असलेल्या देशाची मुक्तता करण्यासाठी मी त्यागाची पराकाष्ठा करण्याची प्रतिज्ञा घेत आहे.' आपल्यानंतर सर्वच विद्यार्थी असे करतील असे वाटले होते. परंतु व्यंकटेश एकटाच तसा निघाला. या प्रसंगाने व्यंकटेश निराश झाला नाही. त्याने स्थानिक काँग्रेसच्या नेत्यांना भेटून आपल्याला काही काम द्या असे सांगितले. खांद्यावर खादीचे गठ्ठे घेऊन व्यंकटेश सोलापूरजवळच्या खेड्यापाड्यांतून हिंडला. खूप पायपीट केली. भले-बुरे अनुभव घेतले. गांधीजींनी असहकार पुकारण्याची हाक सर्व देशाला दिली होती. या हाकेला ओ देण्यासाठी व्यंकटेशने सरकारी शाळा सोडून दिली व असहकाराचा प्रचार करीत तो हिंडला. याच वेळी राष्ट्रीय नेत्यांनी असहकार आंदोलनात भाग घेण्यासाठी वेगळी राष्ट्रीय शाळा, महाविद्यालय व विद्यापीठ काढले होते. व्यंकटेश मॅट्रिकच्या परीक्षेला बसला व चांगल्या रीतीने पासही झाला. त्याचे भाषाविषय पहिल्यापासून चांगले होते. त्याचा उपयोग झाला. मॅट्रिक झाल्यावर पुढे काय हा प्रश्न पडला. चाकोरीतले शिक्षण नकोसे झाले होते. प्रत्यक्ष राजकारणात पडण्याची खूप इच्छा होती व तयारीही होती. परंतु तसा योग यावयास अवकाश होता. व्यंकटेश शोधात होताच. त्याला कोणीतरी अमळनेरच्या राष्ट्रीय महाविद्यालयाचा पत्ता दिला. जवळ पूर्वीपासूनच काही नव्हते. विंचवाचे बिऱ्हाड पाठीवर असते. व्यंकटेशपाशी तेवढेही नव्हते. तो तडक अमळनेरला रवाना झाला. स्वामीजी म्हणतात की, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची खरी घडण या दोन वर्षांत अमळनेरलाच झाली. मूस येथेच ओतली गेली. एकांतप्रियतेला चिंतनाची व वाचनाची जोड मिळाली व हैद्राबादचा मुक्तिदाता येथून परत आपल्या अज्ञात भविष्याकडे वाटचाल करीत राहिला.

❦ ❦

# ३

# कामगार क्षेत्रात पदार्पण

व्यंकटेश खेडगीकर देशभक्तीची ज्वलंत भावना घेऊन चाकोरीबद्ध शिक्षण सोडून अमळनेरच्या राष्ट्रीय महाविद्यालयात प्रविष्ट झाला. जुलै १९२१ मध्ये स्वामीजी अमळनेरला आले. त्यांच्या देशभक्तीला आणि त्यांच्यातील अध्यात्मिकतेला खरा पाया मिळाला तो अमळनेरलाच. स्वामीजींनी आपल्या आठवणींच्या संग्रहात या काळाचे तपशिलाने वर्णन केले आहे. त्यांना गांधीजींचे जबरदस्त आकर्षण होते हे आपण मागे बघितलेच. हे आकर्षण पुढच्या आयुष्यात वाढत गेले व त्याला डोळस श्रद्धेचे व वैचारिक निष्ठांचे अधिष्ठान लाभले. गांधीजींखेरीज ज्या व्यक्तींचा स्वामीजींवर फार मोठा प्रभाव पडला, त्यांत लोणावळ्याच्या मुक्तिधामाचे स्वामी कुवलयानंद यांचा समावेश आहे. स्वामी कुवलयानंद पूर्वाश्रमीचे ज. ग. गुणे. ते स्वतःच अध्यात्मप्रवण प्रकृतीचे होते व गांधीजींच्या विचारांनी भारलेले होते. गुणे यांच्यासारख्या देशभक्त सहकाऱ्यांनीच अमळनेरला राष्ट्रीय महाविद्यालय काढले होते. स्वामीजींना तेथेच चिंतनाची, वाचनाची, आत्मनिरीक्षणाची सवय जडली. येथे शिकत असतानाच अहमदाबादी काँग्रेसचे अधिवेशन झाले. गांधीजींनी राजकारणात प्रवेश करून व लोकमान्य टिळकांना जाऊन जेमतेम वर्ष-दीड वर्षाचा काळ लोटला होता. गांधीजींच्या डोक्यात प्रत्यक्ष कृतीचा संकल्प दृढ होत होता. बार्डोलीच्या सत्याग्रहाला त्याच वेळी तोंड लागले. अमळनेरच्या महाविद्यालयात अवघे २९ विद्यार्थी होते.

परंतु हे सर्व तरुण देशप्रेमाच्या भावनेने पेटून निघालेले होते. या तरुणांसमोर गुणे यांचा आदर्श होता. आपण स्तब्ध बसून शिक्षण चालू ठेवण्याची कल्पना या युवकांना असह्य झाली. त्यांनी सत्याग्रहात भाग घेण्याचे ठरविले. स्वत: प्राचार्य गुणेही सत्याग्रहात भाग घेणारेच होते. परंतु झाले असे की, नेमके त्याच वेळी चौरीचौरा प्रकरण झाले व गांधीजींनी चळवळ स्थगित केली. या तरुणांची घोर निराशा झाली. अमळनेरची घडी याच वेळी विस्कटली. स्वामीजी अमळनेर सोडून पुण्याला आले. तेथे टिळक महाराष्ट्र विद्यापीठात देशभक्तांचा चांगला गट एकत्र झाला होता व त्या गटाने इंग्रजी साच्याच्या शिक्षणाला पर्याय म्हणून वेगळेच शिक्षण सुरू केले होते. स्वामीजी त्या विद्यापीठात दाखल झाले. येथेच ते वाङमयविशारद झाले. इतिहास, अर्थशास्त्र व राजनीति शास्त्र हे त्यांचे विषय होते. पुढे 'लोकशाहीचा विकास' या विषयावर त्यांनी प्रबंध लिहिला व एम्. ए. ची पदवी संपादन केली. या वेळेपर्यंत स्वामीजींचे वाचन, लेखन, चिंतन आणि वक्तृत्व चांगलेच आकाराला आले होते. गांधीजी याच वेळी आजारी पडले व त्यांच्यावर शस्त्रक्रिया करण्याचे ठरले. स्वामीजींच्या मनात गांधीजींविषयीचे आकर्षण वाढतच चालले होते. त्यांची अनिवार इच्छा होती की, एकदा समक्ष गांधीजींना भेटून यावे. सोलापूरच्या स्टेशनवर छोट्या व्यंकटेशचे खांदे धरून त्याला देशासाठी काहीतरी कर असे सांगणारे गांधीजी स्वामीजींच्या मनात व त्यांच्या पूर्ण व्यक्तिमत्त्वात भिनत चालले होते. गांधीजींना आपण रुग्णालयात जाऊन कसे भेटलो यासंबंधीची त्यांची आठवण अतिशय हृद्य आहे.

पुण्याच्या ससून रुग्णालयात अपेंडिसायटिसच्या आजारावर उपचार करण्यासाठी गांधीजींना दाखल करण्यात आले होते. पुण्याकडे त्यावेळी पुढाऱ्यांची रीघ लागली होती. पुढारी येत, गांधीजींना भेटत व जाहीर सभांतून त्यांची भाषणे होत. गांधीजींच्या दीर्घायुरारोग्यासाठी सर्वधर्मीय लोकांच्या सार्वजनिक प्रार्थनाही सुरू झाल्या होत्या. स्वामीजी आपल्या आठवणीत सांगतात की, 'मौलाना महंमद अली पुण्याला आले. त्यांना संध्याकाळी रुग्णालयात जावयाचे होते. दुपारी आम्हा

विद्यार्थ्यांच्या सभेत ते भाषण करणार होते. विद्यार्थी संघाचा अध्यक्ष या नात्याने त्या सभेच्या अध्यक्षस्थानी मीच राहणार होतो. त्यांचे भाषण संपल्यावर मी त्यांच्याबरोबर रुग्णालयात गेलो व महात्मा गांधींच्या खोलीत त्यांच्याबरोबर मलाही येऊ देण्याची मी त्यांना विनंती केली. त्यांनी ती मान्य केली.' स्वामीजी त्या खोलीत काय घडले याचे वर्णन पुढीलप्रमाणे करतात. 'त्या लहान खोलीचे दार उघडले गेले. मी दारातच उभा राहिलो. मी तेथून महात्माजींना पूर्णपणे पाहू शकलो. ते खूप अशक्त झाले होते. तरीही ते तेवढेच आनंदी दिसले. मौलाना महंमदअली त्यांच्या पायावर लोटांगण घेऊन ओक्साबोक्शी रडू लागले. सर्जन, जेलचे अधिकारी इत्यादी चार पाच जण कसे अश्रू ढाळत होते हे मला चांगले आठवते. किती वेळ असे चालले होते याची कुणालाच कल्पना नव्हती. महात्माजींनी डोळे उघडले आणि काळजीचे काही कारण नाही असे त्यांनी आपल्या दृष्टिक्षेपानेच मौलानांना सुचविले.' मौलानांची मते पुढे बरीच बदलली. परंतु स्वामीजींच्या मनावर ठसली ती मौलानांची तेव्हाची ती मूर्तीच.

स्वामीजी चाचपडत होते. देशासाठी आपले आयुष्य घालवावे हे त्यांच्या मनाने ठाम ठरवून तर टाकले होते, परंतु नक्की क्षेत्र सापडत नव्हते. तथापि त्यांच्या वैचारिक आणि भावनिक जीवनावर गांधीजींचा प्रभाव क्षणोक्षणी वाढत चालला होता. गांधीजींसंबंधीची अशीच एक आठवण स्वामीजींनी नोंदविलेली आढळते. गांधीजी बरे होऊन काही दिवस मुंबईस विश्रांतीसाठी गेले. प्रकृती बरी झाल्यानंतर ते पुण्याला परत आले. त्यांच्या हस्ते विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या पुतळ्याचे अनावरण होणार होते. पुण्यात एकीकडे गांधीजींच्या स्वागताचा उत्साह होता तर दुसरीकडे त्यांच्या नेतृत्वाची निंदानालस्ती करण्याचा काही लोकांचा उद्योग चालू होता. स्वागतासाठी व्यापक समिती नेमली गेली. व्यासपीठ उभारायचे ठरले. स्वामीजी स्वयंसेवक म्हणून व्यासपीठावरच कामगिरी बजावणार होते. याच वेळी या उत्साहाला गालबोट लागावे या उद्देशाने गांधीजी आणि टिळकांची तुलना सुरू झाली. टीकाकारांचा प्रयत्न असा होता की, टिळकांच्या तुलनेत गांधीजींचे व्यक्तिमत्त्व खुजे

आणि छोटे दाखवावे. ही गोष्ट गांधीजींच्या कानावर गेली. सभेत त्यांनी या टीकेला उत्तर दिले, तेव्हा गांधीजी पराकोटीचे भावविव्हल झाले होते. स्वामीजी म्हणतात की, पुढे कधीही त्यांनी गांधीजींना एवढे भावनाकुल झाल्याचे बघितले नाही व त्यांचे तसे भाषण कधी ऐकले नाही. गांधीजी म्हणाले, ' जे लोक माझी टिळकांशी तुलना करतात ते फार मोठी भूल करतात. ' गांधीजी बोलत होते व त्यांच्या डोळ्यांवाटे अश्रू ओघळत होते. सारी सभा मंत्रमुग्ध होऊन हा प्रसंग मनात साठवून घेत होती. त्या दिवशी मला अश्रूंचे मोल समजले, असे स्वामीजींनी म्हटले आहे. गांधीजी फक्त एवढेच म्हणाले की, ' मी एक साधा स्वातंत्र्याचा पाईक आहे. टिळकांची व माझी बरोबरी कसली करता ? टिळक हिमालयाएवढे मोठे होते.' हे ऐकले आणि पुण्यातले सर्व वातावरणच पालटून गेले. स्वामीजी म्हणतात की, याच दिवशी त्यांनी देशासाठी सर्वस्वाचे समर्पण करण्याचा आपला निर्धार पुन्हा पक्का केला. गोंधळ संपला आणि त्यांनी देशसेवेची पहिली संधी कामगार क्षेत्राच्या निमित्ताने घेतली.

झाले असे की, पुण्यामधे स्वामीजी व त्यांचे मित्र यांचा एक गट तयार होत होता व त्या सर्वांनीच भावी आयुष्यात काय काय करावयाचे या संबंधीचे मनसुबे योजून ठेवले होते. याच वेळी सुप्रसिद्ध कामगार पुढारी ना. म. जोशी यांना खाजगी चिटणीसासाठी एका माणसाची गरज भासली. तशी जाहिरात आली. स्वामीजींच्या मित्रांनी त्यांना अर्ज करण्याचा आग्रह केला. हा अर्ज आताच्या सारखा 'पाहिजे' या सदरातला नव्हता तर ज्याला कामगार क्षेत्रात पदार्पण करून ना. म. जोशी यांचे सहाय्यक व्हावयाचे असेल त्याने ' भांडवल आणि श्रम ' या विषयावर एक सविस्तर प्रबंध लिहून पाठवावयाचा होता. स्वामीजींचे वाचन झपाट्याने चालूच होते. पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठात आणि आधी अमळनेरला मार्क्स व त्याचे विचार यांचा परिचय झाला होता. अर्थशास्त्राचेही वाचन चालू होते. एके दिवशी स्वामीजींना समजले की, त्यांचा प्रबंध ना. म. जोशींना पसंत पडला व त्या आधारे त्यांनी स्वामीजींना कामावर रुजू होण्याविषयी सांगितले.

स्वामीजी कार्यक्षेत्राच्या शोधात होतेच. ना. म. जोशी यांच्यासारख्या मोठ्या नेत्याच्या सहवासात राहण्याचे व त्यांच्याबरोबर काम करण्याचे भाग्य लाभणार या कल्पनेतच त्यांनी पडत्या फळाची आज्ञा घेतली व ते मुंबईस आपल्या नव्या कामगिरीवर रुजू झाले.

१९२६ च्या एप्रिलमध्ये स्वामीजी कामगार चळवळीत मुंबई गिरणी कामगार संघाचे उपसंघटक म्हणून दाखल झाले. त्यांचे मुख्य काम मुंबईतील गिरणी कामगारांची जी संघटना अस्तित्वात आहे ती अधिक व्यापक व मजबूत करणे, कामगारांच्या वस्त्यांना भेटून त्यांच्या अडीअडचणी जाणून घेणे. त्यांच्या ज्या तक्रारी असतील त्या सरकार व गिरणीचे व्यवस्थापक यांच्यापर्यंत पोचवणे आणि संघटनात्मक बाबींचा अहवाल ना. म. जोशी यांच्या कानावर घालणे. स्वामीजींकडे प्रामुख्याने कुर्ला येथील कामगार संघटना उभी करण्याचे काम देण्यात आले होते. गिरणी कामगारांच्या मार्फत स्वामीजींचा आपल्या राजकीय आयुष्याच्या अगदी प्रारंभीच घनिष्ठ संबंध आला तो देशातील शोषित व दलित जनतेशी. तो काळ अगदीच निराळा होता. कामगारांना संघटना नावाची चीजच फारशी माहिती नव्हती. त्यामुळे यूनियनचे सभासद नोंदविणे हे काम अत्यंत जिकिरीचे व चिकाटीचे होते. अठराविश्वे दारिद्र्य आणि भयावह अज्ञान यांचे अत्यंत उग्र असे दर्शन याच काळात घडले व आर्थिक, सामाजिक क्षेत्रात समतेची अनिवार्यता किती आहे हे स्वामीजींच्या मनावर पक्के ठसले. राजकारणाच्या धकाधकीत स्वामीजींवर पुढच्या काळात त्यांच्या टीकाकारांनी बुद्धि-पुरस्सरपणे ते कम्युनिस्ट असल्याचा आरोप केला होता. स्वामीजी पुढे हैद्राबाद संस्थानी जनतेचे पुढारी म्हणून उदयाला आले. त्यांच्या राजकीय व सामाजिक तत्त्वचिंतनाला गांधीजींच्या विचारांची जशी बैठक मिळाली त्याचप्रमाणे लोकशाही आणि समाजवाद यांचेही ते आग्रही पुरस्कर्ते बनले. त्यांच्या या वैचारिक प्रवासाला निश्चित दिशा देण्याचे काम मुंबईच्या गिरणी कामगारांनीच केले. या काळात स्वामीजींचा अनेक नामवंत कामगार पुढाऱ्यांशी व कार्यकर्त्यांशी संबंध आला. त्यांत एस. एच. झाबवाला, एफ. जे. जिनवाला, आर. आर. बखले

आणि इंग्लंडमधील कम्युनिस्ट क्रांतिकारक व कामगार पुढारी एन. बी. सकलातवाला इत्यादींचा समावेश होता. यांपैकी सकलातवाला हे ब्रिटिश पार्लमेन्टचे सभासद असलेले हिंदी गृहस्थ होते. ते भारतात आले. (१९२६) तेव्हा कामगार पुढारी म्हणून गिरणी कामगारांच्या वतीने त्यांचे मुंबईला भव्य स्वागत करण्यात आले. स्वागत करणारांत व सकलातवालांच्या निरनिराळ्या कामगार वस्त्यांना भेटी संघटित करणारांत स्वामीजींचा प्रमुख भाग होता सकलातवालांसमवेत ते मुंबईभरच्या कामगार वस्त्यांतून गेले. आग ओकणारे वादळी वक्तृत्व आणि शब्दांचे अत्यंत मर्मभेदी आघात ही सकलातवालांच्या व्यक्तित्वाची अविभाज्य गुणवैशिष्टये होती. स्वामीजी म्हणतात की, सकलातवालांच्या वक्तृत्वाचा आपल्यावर फार प्रभाव पडला.

ज्या ना. म. जोशी यांच्या आवाहनानुसार स्वामीजी मुंबईला गिरणी कामगारांत कार्य करण्यासाठी गेले होते, त्यांच्याविषयी स्वामीजींनी आपली मते नेटकेपणाने नोंदवून ठेवली आहेत. ना. म. जोशी यांचा अंतर्भाव तेव्हा एक नेमस्त व मवाळ कामगार पुढारी म्हणून होत असे. ब्रिटिश सरकारने जे केंद्रीय कायदेमंडळ नेमले होते त्यात त्यांचा समावेश सरकारी सभासद म्हणून करण्यात आला होता. तथापि स्वामीजी म्हणतात की, ना. म. जोशी त्यांना अनेक बाबतींत अत्यंत पुरोगामी व जहाल पुढारी वाटले. सरकारवर टीका करण्याची पाळी आली आणि जोशी डगमगले अथवा त्यांनी संकोच केला असे कधीच झाले नाही. ना. म. जोशी अकारण टीका करीत नसत. शब्दांचा अत्यंत संयमी आणि विवेकी उपयोग ते करीत असत. परंतु त्यांची टीका मर्मभेदी असे. कामगार क्षेत्रामध्ये त्या काळी आताच्याप्रमाणे भिन्न राजकीय पक्षांच्या संघटना नव्हत्या. सर्वांची मिळून एकच संघटना होती. ना. म. जोशी यांचा यावर कटाक्ष होता की, कामगार संघटनांचे काम राजकीय व पक्षीय दृष्टीतून करता कामा नये. कामगार संघटनांची संपूर्ण निष्ठा कामगारांच्या प्रश्नांशीच असली पाहिजे. आपल्या या विचारावर ते शेवटपर्यंत अढळ राहिले. त्यामुळे त्यांच्याविषयी जहालांपासून मवाळांपर्यंत सर्वांनाच नितान्त आदर होता.

त्यांचा शब्द कोणी मोडीत नसे. दररोज १६ ते १८ तास काम करून त्यांनी मुंबईच्या गिरणी कामगारांचीच नव्हे तर भारतातील कामगारांची फार मोठी सेवा बजावली. कामगार संघटनांचे जनकत्व त्यांच्याकडे देणेच उचित होईल.

दिल्लीत असतानाच तेथील थंडीने स्वामीजींच्या कृश प्रकृतीवर हल्ला केला. त्यांच्या पायांवरून थंडीचे वारे गेले. आपले पाय बधिर झाल्याचे त्यांना जाणवले आणि त्यांनी लगेच दिल्लीचा निरोप घेतला. स्वामीजींनी सरळ मुंबई गाठली. तेथ त्यांच्या आजाराचे निदान झाले व आपण एका दुर्धर रोगाची शिकार झालो आहोत हे त्यांच्या लक्षात आले. पक्षाघाताच्या या आजारात पुढचा १८ महिन्यांचा काळ गेला. डॉक्टरांच्या सांगण्यावरूनच स्वामीजींनी मुंबई सोडली. ते सोलापूरला गेले. परंतु रोग बरा होईना. शेवटी ते तशा अवस्थेत पुण्यात आले. स्वामीजींचे एक मित्र पुण्यामध्ये आयुर्वेदीय रुग्णालय चालवीत होते. तेथे राहून त्यांनी बरेच दिवस औषधोपचार घेतला. परंतु फारसा उपयोग होईना. शेवटी अहमदनगरला आयुर्वेद महाविद्यालयात जाण्याचे ठरले. तेथील महाविद्यालयातही स्वामीजींचे मित्र होते. पुण्याहून नगरला आणण्याचा निर्णय घेण्यात जे मित्र अग्रेसर होते त्यांत डॉ. बा. चिं. लागू यांचा समावेश होता. हे स्वामीजींचे नजीकचे मित्र होते. पुढे राजकारणात हे लागू खूपच प्रसिद्धीला आले. स्वामीजींना टॅक्सी करून नगरला आणले त्याचे आणखी एक कारण असे होते की, तेथे जे गंगाधरशास्त्री गुणे प्राध्यापक म्हणून काम करीत होते ते स्वामीजींना अमळनेरपासून ओळखीत होते. अमळनेरच्या विद्यालयाचे तेच प्रमुख होते. ते विद्यालय सोडतानाच गुणे यांनी स्वामीजींना सांगून ठेवले होते की, पुन्हा गरज पडली तर मजकडे येण्यास संकोच करू नकोस. या गुणे शास्त्रींनी आपले कसब पणाला लावून स्वामीजींना जवळ जवळ जीवदानच दिले. बरेच महिने रुग्णालयात एकाकी खोलीत पडून राहिल्यामुळे स्वामीजींच्या ठिकाणची मुळातली एकांतप्रियता अधिकच वाढली. आजाराच्या फटक्याने वैराग्य विचार प्रबळ झाला. आधीपासूनच ओढा संन्यासाकडे होता. नगरच्या मुक्कामात विरक्तवृत्ती अधिक वाढली.

चिंतन व मननही खूप झाले. शेवटी बरे होऊन अठरा महिन्यांच्या आजारानंतर १९२८ च्या ऑगस्टमध्ये स्वामीजी परत सोलापुरी आले.

दरम्यान ना. म. जोशी यांनी त्यांना परत कामावर रुजू होण्यास सांगितले. परंतु कामगार क्षेत्रातील परिश्रम व मुंबईचे हवामान मानवणार नाही म्हणून त्यांनी इतरत्र जाण्याची परवानगी मागितली. ना. म. जोशींनी स्वामीजींना सोलापुरीच जाण्यास सांगितले. तेथील गिरणी कामगार संपावर होते. सुमारे वीस हजार कामगारांचा हा संप चार महिने चालला. या संपाचे नेतृत्व नंतर स्वामीजींकडे आले. संप अत्यंत शांतपणे चालू होता. कुठेही अनुचित काही घडत नव्हते.

स्वामीजींनी निदर्शनाचा कार्यक्रम हाती घेतला व दररोज निदर्शनांचा धडाका सुरू केला. परंतु पुढे पोलिसांच्या मनात काळेबेरे आले. त्यांनीच अत्याचार करून कामगारांना हिंसक होण्यास प्रवृत्त केले. यात स्वामीजींना अटक झाली. साध्या कैदेची शिक्षाही झाली. इतर अनेक कामगार व कार्यकर्ते पकडले गेले. सुटून आल्यानंतर मात्र कामगारांच्या संघटनेत फाटाफूट झाल्याचे निदर्शनास आले. याच सुमारास स्वामीजींना सुप्रसिद्ध मीरत खटल्यातही गोवण्यात आले. परंतु ना. म. जोशी यांच्यामुळेच त्यांना नंतर त्यातून वगळण्यात आले. संपाचे हे दिवस तर झटपट निघून गेले. परंतु त्यांनी परत स्वामीजींच्या प्रकृतीवर परिणाम केला. धकाधकीचे काम मानवणारे नव्हते. स्वामीजींनी परत ना. म. जोशी यांना लिहिले. त्यांची फार इच्छा होती. की स्वामीजींनी कामगार क्षेत्र सोडू नये. त्यातच राहावे व झेपेल ते काम करावे. परंतु स्वामीजींची अधू प्रकृती साथ देईना. कुठे तरी शांत, वर्दळीपासून दूर असलेल्या ठिकाणी जाण्याची इच्छा प्रबळ झाली. आपले संकल्प बलवत्तर असले की तेच आपल्यासमोर साकार होऊन उभे राहात असतात. ते आपल्या इच्छाशक्तीचेच स्वरूप असते. एरवी आपण खूप विचार करतो परंतु नेमका मार्ग सापडत नाही. आपण चाचपडत असतो आणि मग अचानकच आपली इच्छाच आपल्याला वाट दाखविण्यास सज्ज होते. स्वामीजी ज्या ध्येयवादाची स्वप्ने रंगवीत असत, त्याकडे अलगद नेणारा मार्ग त्यांना याच संभ्रांत अवस्थेत सापडला. स्वामीजी हैद्राबाद संस्थानात व मराठवाड्यात आले.

❦ ❦

## ४

# मराठवाड्यात आगमन

लोकमान्य टिळकांचे निधन होऊन भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर महात्मा गांधींचे नेतृत्व उदयाला येऊ लागले होते. गांधीजींनी स्वराज्यासाठी संघर्षाचा प्रारंभ स्वदेशी आणि बहिष्कार यांपासून केला. कोर्ट-कचेऱ्या आणि शाळा-कॉलेजे गांधीजींच्या आदेशा-प्रमाणे देशभर ओस पडली. हैद्राबाद संस्थान हे आसफिया घराण्याचे संस्थान होते. सातव्या निजामाने (मीर उस्मान अली खान) आपल्या संस्थानाला व तेथील प्रजेला बाहेरच्या ब्रिटिश हिंदुस्थानातील स्वातंत्र्य-आंदोलनाचे व प्रागतिक चळवळीचे वारे लागू नये अशी काळजी आधीपासूनच घेतली होती. सरहद्दीवर निजामची करोडगिरीची (कस्टमस्‌ची) नाकी होती. ती केवळ चीजवस्तू आणि आयात-निर्यातीचा मालच थोपवीत नव्हती तर स्वातंत्र्याच्या विचारांवर त्यांचा विशेष कटाक्ष होता. खादीसारखे साधे कपडे दिसले तर निजामी पोलिस व कस्टमवाले दचकत असत. तथापि निजामाला हे माहीत नव्हते की, मानवी स्वातंत्र्याचा विचार जगभर कुठेच कोणत्याही सत्तेला बंदिस्त करता आला नाही. माणसाचे शरीर तुरुंगात डांबून ठेवता येते, परंतु त्याची स्वातंत्र्याकांक्षा तुरुंगाच्या गजाआड अथवा तटांच्या आड दडवून ठेवता येत नाही. इंग्रजी हद्दीत जेवढ्या म्हणून चळवळी झाल्या त्या सर्वांचे पडसाद जुन्या हैद्राबाद संस्थानात व मराठ-वाड्यात सातत्याने उमटत गेले. गांधीजींनी बाहेर बहिष्काराचा आदेश दिला आणि इंग्रजी हद्दीत हैद्राबादची जी मुले शाळा-कॉलेजातून शिकत

होती, त्यांनी शाळा-कॉलेजांचा त्याग केला. या मुलांतूनच पुढे स्वातंत्र्य आंदोलनात भाग घेणारे नेते तयार झाले.

बाहेर म्हणजे प. महाराष्ट्रात क्रांतिकारकांचाही एक काळ होऊन गेला. क्रांतिकारकांशी संबंधित असणारे जेव्हा परागंदा झाले तेव्हा त्यांच्यापैकी काही मराठवाड्यात येऊन राहत असत. विनायकराव भुस्कुटे आपल्या काही सहकाऱ्यांसह औसा येथे व्यंकटराव देशमुख यांच्याकडे भूमिगत होते. पुढे व्यंकटराव यांचे बंधू अनंतराव कुलकर्णी पुण्याला शिक्षणासाठी गेले तेव्हा ते भुस्कुटे यांच्याकडेच राहू लागले. अनंतराव आणि व्यंकटराव सख्खे बंधू, परंतु अनंतराव दत्तक गेले, त्यामुळे ते पुढे कुलकर्णी म्हणून ओळखले जाऊ लागले. व्यंकटराव हे औसा येथे वकिली करीत. त्यांच्या मनावर क्रांतिकारकांचे फार गडद संस्कार झाले होते. त्यांनी तुळजापूर तालुक्यातील हिप्परगा या छोट्याशा गावी राष्ट्रीय चारित्र्य घडविणारे एक गुरुकुल पद्धतीचे निवासी हायस्कूल काढले. आरंभी ती फक्त एक प्राथमिक शाळा होती. अनंतराव न्यू पूना कॉलेजात बी. ए. च्या वर्गात होते. त्यांनी बहिष्काराच्या आंदोलनात भाग घेतला व ते औशाला आपल्या बंधूंकडे आले. सन १९२१ ला विजयादशमीच्या मुहूर्तावर हिप्परग्याच्या शाळेची स्थापना या बंधुद्वयांनी केली. अनंतराव शाळेत स्वतः राहून शिकविण्याचे व संचालकाचे काम करीत. व्यंकटराव स्वतःच्या वकिलीचा व शेतीपोतीचा पैसा शाळेला लावीत. अनंतराव यांनी सात-आठ वर्षे हा प्रयोग यशस्वी रीतीने केला व शाळेचे रूपांतर हायस्कूलमध्ये केले. जुन्या हैद्राबाद संस्थानाच्या इतिहासात या संस्थेला अनन्यसाधारण स्थान प्राप्त झाले. हैद्राबादच्या स्वातंत्र्य आंदोलनाचा नेता, सरसेनानी आणि जनतेचा मुक्तिदाता या छोट्याशा परंतु जाज्वल्य संस्थेने हैद्राबादच्या जनतेला मिळवून दिला. भावी नेतृत्व येथेच, याच संस्थेत उदयाला आले आणि येथे एका छोट्या निवासी शाळेत स्वातंत्र्याचे जे स्फुलिंग पेटले, त्यानेच पुढे विक्राळ स्वरूप धारण केले. हैद्राबाद संस्थानातील शाळा-कॉलेजातील मुलांना निजामी सत्ता परमेश्वराच्या नावावर एक प्रार्थना म्हणावयास लावीत असे. त्या प्रार्थनेत निजामाला, त्याच्या सिंहासनाला,

त्याच्या आसफिया घराण्याला व त्या घराण्याच्या पिवळ्या झेंड्याला इस्लामी पुराणकथातील चिरंजीव 'हजरत खिजर' प्रमाणे उदंड आयुष्य दररोज मागितले जात असे. पुढे जेव्हा भारताला स्वातंत्र्य मिळाले व हैद्राबादने स्वतंत्र भारतात विलीन होण्याचे नाकारले तेव्हा इत्तेहादुल मुस्लिमीन या संघटनेचा नेता कासिम रझवी याने अशी दर्पोक्ती केली होती की, हा आमचा आसफिया ध्वज आम्ही दिल्लीच्या लाल किल्ल्यावर फडकवू आणि हिन्दी महासागरच्या व बंगालच्या उपसागराच्या लाटा निजामाचे चरण धुण्यास दौडत येतील, तेव्हाच आमचा जिहाद थांबेल. उन्मत्त सत्ता व तिचे मगरूर उपासक यांची ही घमेंड एका संन्याशाच्या रूपाने अवतीर्ण झालेल्या जननेतृत्वाने जिरवली. लाल किल्ल्यावर तिरंगा फडकला आणि केवळ बंगालचा उपसागर आणि हिंदी महासागरच नव्हे तर अरबी समुद्रही भारतीय स्वातंत्र्याच्या गगनभेदी ऊर्मींना आपल्या लाटांच्या तांडवांनी साथ देत गेला. काळाच्या प्रवाहात कुचकामी ठरलेल्या अनेक सत्ता या सागरतळी बुडाल्या. त्यांचे पुढे नावनिशाणही उरले नाही. ही एवढी बलवत्तर ऐतिहासिक घटना हिप्परग्याच्या याच माळरानावर अंकुरली.

स्वामी रामनंद तीर्थ संन्यास घेण्याच्या आधीच हिप्परग्याला आले. त्यांची प्रकृती पक्षाघातामुळे फारच अशक्त झाली होती. मनात असूनही त्यांना कामगार नेते, ना. म. जोशी यांची कामगार क्षेत्रात राहून काम करण्याची इच्छा पूर्ण करता आली नाही. ते सोलापुरी कामगारांत काम करीत असतानाच हिप्परग्याची संस्था चालविणाऱ्या अनंतराव कुलकर्ण्यांना स्वामीजींचा पत्ता लागला. तुमची प्रकृती अशी, तुम्ही ही धकाधकी सोडून एका खेड्यात रचनात्मक कार्यासाठी का येत नाही, अशी त्यांनी स्वामीजींना पृच्छा केली. स्वामीजी कोलाहल सोडून कुठेतरी शान्त, निवांत ठिकाणी जाण्यास उत्सुक होते. आयुष्य राष्ट्रासाठी वेचण्याचा संकल्प आधीच सुटला होता. प्रतीक्षा योग्य कार्यक्षेत्राची होती. स्वामीजींकडे हे कार्यक्षेत्र आले. अनंतरावांनी ते हिप्परग्याला काय करीत आहेत याची कल्पना दिली व त्यांच्या या ग्रामीण निवासी हायस्कुलाला मुलांत राहून त्यांच्यावर देशभक्तीचे,

त्यागशीलतेचे, ध्येयवादित्वाचे आणि मानवतेचे संस्कार करणारा मुख्याध्यापक हवा आहे असे सांगितले. स्वामीजींनी होकार दिला व कामगारक्षेत्राला कायमचा रामराम ठोकून त्यांनी १९२९ सालातील जून महिन्यात मराठवाड्यात प्रवेश केला. सोलापूरहून ते थेट हिप्परग्यालाच आले.

या विद्यालयाची काही खास वैशिष्टये होती. ती नमूद करण्यापूर्वी स्वामीजींविषयी एक हकिगत येथेच सांगणे उचित होईल. स्वामीजींनी हिप्परग्याला मुख्याध्यापक म्हणून येण्याचे मान्य केले, तेव्हा त्यांना वेतन काय घ्याल अशी विचारणा करण्यात आली. ना. म. जोशी यांच्याबरोबर ते पूर्णवेळ कामगार कार्यकर्ता म्हणून काम करीत असत. तेव्हा त्यांना मासिक रु. ६० वेतन दिले जात असे. वस्तुत: हे वेतन नव्हते तर निमित्तमात्र मानधन होते. स्वामीजींनी शाळेच्या संचालकांना सांगितले की, वेतन घेऊन काम करण्याची अगर नोकरीची मला सवय नाही, तशी इच्छाही नाही. माझ्यावर कोणी अवलंबून नाही. माझे घरदार नाही. मला कसल्याच सवयी नाहीत. पोटापुरते अन्न व अंग झाकण्यापुरते कपडे मिळाले की पुरे. संचालकांनी यावर आपला संकल्प असा सांगितला की ते मानधन घेवो अथवा न घेवो त्यांच्या नावे दर महिन्याला ५० रु. जमा केले जातील. गरज पडेल त्याप्रमाणे स्वामीजींना या रकमेतून पैसे घेता येतील. स्वामीजी म्हणतात की, त्यांना या संस्थेत असेपर्यन्त पैसे उचलण्याची गरजच पडली नाही. शेवटी त्यांनी जेव्हा संन्यास ग्रहण केला तेव्हा त्यांनी त्यांच्या नावे जमा झालेली सर्व रक्कम त्याच संस्थेला देऊन टाकली.

हे हायस्कूल नुसतेच खेड्यात नव्हते तर हिप्परग्यासारख्या हजार-पाचशे वस्तीच्या बाहेर असणारे हे एक गुरुकुल होते. मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण येथे दिले जाई. एका मैदानात ओढ्याच्या काठी झोपड्या घातलेल्या होत्या. त्यांतल्या काही मोठ्या आकाराच्या. मुले आणि शिक्षक या झोपड्यांतून एकत्रच राहात असत. सगळ्यांचे जेवण एकच. खादीचा पेहराव. प्रत्येकी दोन घोंगड्या, थाळी, तांब्या आणि वाटी एवढा प्रपंच. अंथरूण गोळा करून ठेवले की, त्याच झोपडीचा वर्ग बने.

कधी कधी शिक्षक उघड्यावर झाडाखालीही शिकवीत. नेमून दिलेल्या अभ्यासक्रमाचा अभ्यास पूर्ण करून येथील मुलांना मुंबई इलाख्यातील मॅट्रिकच्या परीक्षेला बसविले जाई. स्वामीजींच्यामुळे या शाळेत अनेक नामवंत मंडळी अध्यापक म्हणून आली. हैद्राबादच्या स्वातंत्र्य आंदोलनात ज्यांनी बहुमोल कामगिरी केली ते स्वामीजींचे सुहृद रा. गो. तथा बाबासाहेब परांजपे येथे विज्ञानाचे शिक्षक होते. ह. रा. महाजनी, आचार्य ग. धों. देशपांडे, श्री. रं. देशपांडे (एस. आर.), के. के. देशपांडे, वा. गो. दाते, तासगावचे एस. के. कुलकर्णी, ग. ग. देव, आर्यसमाजी डॉ. डी. आर. दास, खादी ग्रामोद्योगाचे कार्य करणारे कै. बाबूराव कानडे, रा. श्री. दिवाण, दादाराव गवळी गुरुजी, आदी या शाळेच्या अध्यापकांत समाविष्ट होते. सुप्रसिद्ध कादंबरीकार व ज्ञानपीठ पारितोषिक विजेते कै. वि. स. खांडेकर यांनी या शाळे-विषयी 'हिप्परग्याच्या माळरानावरील बाग' या मथळ्याखाली एक सविस्तर लेखच १९४२ च्या किर्लोस्कर मासिकात छापला. हा लेख पुढे त्यांच्या 'गोफ व गोफण' या संग्रहात समाविष्ट करण्यात आला.

या शाळेतून पुढे मराठवाड्यात व तेव्हाच्या हैद्राबाद संस्थानात स्वातंत्र्य आंदोलनात उडी घेणारे व स्वातंत्र्यासाठी प्राणाची बाजी लावणारे कार्यकर्ते निर्माण झाले. त्यांची नामावली विस्तारभयास्तव येथे देत नाही. या शाळेचा पहिला विशेष असा की, तेथे कोणीच धर्म, पंथ व जातपात मानीत नसे. सर्वांचे राहणे, खाणे–पिणे एकत्रच. पुढे खासदार म्हणून नावलौकिकास आलेले दलित नेते तुळशीरामजी कांबळे याच शाळेचे विद्यार्थी होते. देवीसिंह चौहान नंतर मंत्री झाले. तेही याच शाळेचे विद्यार्थी. नेमून दिलेल्या अभ्यासक्रमाखेरीज येथे मुलांना बरेच शिकविले जात असे. खरे म्हटले तर हे शिकविणे नव्हते, मुलांचे व्यक्तित्व घडवणेच असे. मूर्तिकार तन्मयतेने मूर्ती घडवितो तसे येथील शिक्षक खेड्यापाड्यांतून आलेल्या मुलांच्या व्यक्तित्वाची घडण करीत असत. नकळत हे घडत असे. या शाळेचा गाजलेला विशेष म्हणजे दररोजचा पंधरा मिनिटांचा तास. शाळा संपल्यानंतर या पंधरा

मिनिटांत मुलांना विविध विषयांची माहिती दिली जात असे. त्यात थोर पुरुषांची चरित्रे, क्रांतिकारकांची जीविते, उत्तमोत्तम कविता, विविध भाषांतील मौलिक कलाकृती, अनेक वाद आणि सिद्धान्त यांची या तासात माहिती दिली जात असे. महाराष्ट्रात एकेकाळी गाजलेला 'काव्यज्योती' हा संपादित काव्यसंग्रह याच शाळेने तयार केला होता. मराठवाड्यात आणि महाराष्ट्रात अनेक राष्ट्रीय शाळांतून या काव्य-ज्योतीचे मनन व वाचन होत असे.

अशा या शाळेवर त्या वेळच्या निजाम सरकारची वक्रदृष्टी असल्यास नवल नाही. स्वामीजी तेथे जाण्याच्या आधीच १९२७ मध्ये उस्मानाबादच्या कलेक्टरांनी निजाम सरकारला असा अहवाल पाठविला होता की, ही शाळा राज्याच्या अस्तित्वाला धोका निर्माण करीत आहे. येथे राजद्रोही तयार होत आहेत. ही शाळा वेळीच बंद केली नाही तर पुढे पश्चात्ताप करावा लागेल. आणि झालेही तसेच. शाळा बंद झाली. परंतु या शाळेतून उडालेल्या स्वातंत्र्याच्या ठिणग्यांनी पुढे वणवाच पेटवला.

मुलांवर केवळ देशभक्तीचेच नव्हे तर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा सर्व अंगांनी विकास होईल असे संस्कार करण्यावर या शाळेत भर होता मुलांना विद्यार्थिदशेपासूनच स्वावलंबी होता यावे या हेतूने त्यांना नित्योपयोगी छोट्या-छोट्या व्यवसायांचे व उद्योगांचे प्रत्यक्ष शिक्षण दिले जाई. सूतकताई, विणाई, भांड्यांना कल्हई करणे, भांडी झाळणे, बुकबायंडिंग, शिलाई, मोचीकाम असे किती तरी उद्योग मुलांना नित्य जीवनातूनच शिकविले जात असत. या शाळेत जो शिक्षकांचा संच होता त्यातून काही निवडक शिक्षक युवकांनी देशाच्या स्वातंत्र्यासाठी आयुष्यभर व्रतस्थ राहण्याच्या व स्वातंत्र्यासाठी सर्वतोपरी झटण्याच्या, प्रसंगी आत्माहुती देण्याच्या शपथा घेतल्या होत्या. कल्पना अशी होती की, असे शंभर जणांचे एक पथक तयार करावे व हैद्राबाद मुक्त करावे. अनंतराव कुलकर्णी हे स्वतःला स्वामी रामतीर्थांचे अनुयायी म्हणवीत असत त्यांनी या पथकाचे नाव 'रामाचे शंभर सैनिक' असे ठेवले होते. सूफी पंथात 'चहल दरवेश' म्हणून सर्वसंग–परित्यागींची

परंपरा आहे. त्याच धर्तीवर आधी या पथकात ४० जणांचा समावेश झाला. हळूहळू हे केंद्र मराठवाड्याच्या स्वातंत्र्य आंदोलनाचे केंद्र बनत गेले. भारताच्या सर्वोच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती वि. द. तुळजापूरकर या शाळेत आरंभी विद्यार्थी म्हणून होते. त्यांचे वडील 'माझे रामायण-कर्ते' दत्तो अप्पाजी तुळजापूरकर यांना पुढे संस्थानाबाहेर घालविण्यात आले. त्यांचाही या संस्थेशी नित्याचा संबंध आला होता. देशभक्तिपर कीर्तने करणारे निगडीकरबुवा, संगीतज्ञ तेण्डुलकर हेही येथे आपली सेवा रुजू करून गेले. क्रांतिकारकांपैकी इंगळे, चाफेकर, भावे, भुस्कुटे या मंडळींना ही संस्था आपले आश्रयस्थान वाटू लागली आणि अशा रीतीने हे एक जबरदस्त केंद्र उभे राहिले. स्वामीजी आणि बाबासाहेब यांनी क्रांतिकार्याचा हा संकल्प पुढे नेला व प्रत्यक्षात आणला.

या संस्थेत अनंतरावांच्यामुळे अध्यात्माचेही एक केंद्र निर्माण झाले. अनंतराव रामतीर्थांचे भक्त होते. रामतीर्थ प्रकाशन संस्थेशी व त्या संस्थेचे प्रमुख स्वामी नारायण तीर्थ यांच्याशी त्यांचा संबंध होता. स्वामीजी मुळापासूनच एक अपरिग्रही व विरागी वृत्तीचे गृहस्थ होते. त्यांची ही वैराग्य वृत्ती या संस्थेत अधिकच वाढली आणि या संस्थेत येऊन उणे पुरे वर्ष झाले नाही, तोच त्यांनी १४ जानेवारी १९३० रोजी रीतसर संन्यास ग्रहण केला. त्यांना संन्यासाची दीक्षा देण्यासाठी स्वामी रामतीर्थांचे शिष्य व त्यांच्या आश्रमाचे प्रमुख स्वामी नारायण तीर्थ हिप्परग्याला आले होते. त्यांच्या हस्तेच व्यंकटेश खेडगीकर काषायवस्त्रे धारण करून स्वामी रामानंद तीर्थ झाले. बालपणीच व्यंकटेश खेडगी-कराला साधु–संन्याशाचे जबर आकर्षण होते. एका संन्याशापाशी ते संन्यासी होण्यासाठी अडूनही बसले होते. त्यांची ही सुप्त इच्छा १९३० साली पूर्ण झाली.

स्वामीजी संन्यासी झाले. परंतु त्यांच्यात कसलाच फरक पडला नाही. अपरिग्रह वाढला, त्याग वाढला. कुटुंबभावना जाऊन वैश्विक भावना निर्माण झाली. आपले काही नाही. आपण मात्र सर्वांचे आहो. आपली काया मानवजातीच्या सेवेत कष्टावी आणि त्या मेत्रेतच ती पूर्णत्वास मिळावी याचा गुणाकार भगव्या वस्त्रांनी केला. या खेरीज

कसलेच कर्मकांड नव्हते. जपजाप्य नव्हते. तीर्थाटने नव्हती. गूढगुंजनात्मक असे काही नव्हते. स्वामीजींना कधी कोणी पोथी वाचताना, देवळात जाताना, यज्ञयाग करताना अथवा पूजाअर्चा करताना बघितले नाही. परमेश्वराची त्यांना ओढ होती, परंतु त्यांचा परमेश्वर सर्वभूती होता. गांधीजींच्या सहवासाने व त्यांच्या विचारांच्या चिंतनाने स्वामीजी अखेरपर्यंत मानवमात्राच्या सेवेत रमत राहिले.

स्वामीजी या संस्थेत सुमारे सात वर्षे राहिले. शाळेचे नित्याचे काम सांभाळून गावकऱ्यांसाठी व सभोवतीच्या प्रौढांसाठी साक्षरतेचे वर्ग चालविले जात. ग्रामीण भागात जागृती निर्माण व्हावी म्हणून अनेक कार्यक्रम केले जात असत. हिप्परग्याला दर महिन्याच्या शेवटच्या रविवारी तिरंगी झेंड्याचे सामुदायिक वंदन होत असे. तिरंगी झेंडा फडकावणारे व त्याला वंदन करणारे हे पहिलेच गाव निजामी संस्थानात असावे. स्वामीजींचा व त्यांना येऊन मिळालेल्या सहकाऱ्यांचा कल उत्तरोत्तर राजकीय बनू लागला. दरम्यान हिप्परग्याच्या संस्थेतही काही वाईट प्रवृत्ती घुसल्या. अध्यात्माच्या नावावर बुवाबाजी सुरू झाली. स्वामीजींचे सहकारी त्यांच्यामागे लागलेच होते की, त्यांनी दूरवरचे हे खेडे सोडून मोठ्या ठिकाणी यावे व मोठ्या कार्यक्षेत्रात पदार्पण करावे. त्यांच्या काही सहकाऱ्यांनी आधीच निर्णय घेतला व ते संस्था सोडून निघून गेले. तत्पूर्वी १९३५ च्या प्लेगमध्ये हिप्परग्याला मोठा फटका बसला. मुलांसह शाळा सोलापूरला हलवावी लागली. याच वर्षी या संस्थचा सर्व संच विस्कटला होता. स्वामीजींचा सम्पर्क राजकीय दृष्ट्या अधिक व्यापक झाला होता. हिप्परग्याच्या रामाचे शंभर सेवक अथवा भ्रातृसंघाचे अधिष्ठान प्रामुख्याने आध्यात्मिक होते. स्वामीजींचे मन त्यात रमेना. त्यांचे सहकारी स्वातंत्र्यासाठी उतावीळ झाले होते. त्यांपैकी निवडक सहकाऱ्यांनी सोलापूरलाच कायमच्या शपथा घेतल्या. या सहकाऱ्यांत आनंद कृष्ण वाघमारे, दिगंबरराव बिंदू, नारायणराव जोशी, बाबासाहेब परांजपे, अशा सहा-सात जणांचा समावेश होता. या शपथेचा आशय पुढीलप्रमाणे होता, ' मी हैद्राबाद संस्थानातील जनतेला गुलामीच्या जोखडातून मुक्त करण्याची शपथ

घेतो. जनतेच्या या मुक्ततेला मी वाहून घेत असून त्यासाठी माझे सर्वस्व अर्पण करण्याची माझी तयारी आहे.' हा संच पुढे मोठा होत गेला.

१९३५ चा हा सुमार आहे. त्यानंतर म्हणजे १९३६ च्या जूनमध्ये स्वामीजी हिप्परग्याचा कायमचा निरोप घेऊन अम्बाजोगाईस गेले. त्यांचे सहकारी आधी गेलेच होते. ते व बाबासाहेब नंतर गेले. शिक्षणक्षेत्रात अनेकांनी महाराष्ट्रात कार्य केले. कितीतरी थोर व्यक्तींनी आपल्या परिश्रमांतून महाराष्ट्राला शैक्षणिक संस्थांची परंपरा निर्माण करून दिली. परंतु स्वामीजींच्या कार्याची गुणवत्ता, त्याची व्याप्ती आणि त्याचे अधिष्ठान काही निराळेच ह्‍ोते.

स्वामीजी वृत्तीनेच परिव्राजक होते. त्यांचे हिप्परग्याचे सहकारी असे सांगतात की, संन्यास घेण्याच्या आधी सुमारे वर्षभर स्वामीजींनी जेव्हा हिप्परग्याच्या भ्रातृसंघात प्रवेश केला तेव्हाच त्यांनी संपूर्ण अपरिग्रहाचे व्रत स्वीकारले. त्यांच्यापाशी एक ओव्हरकोट ह्‍ोता तो त्यांनी कोणाला तरी देऊन टाकला. पगाराची जी शिल्लक होती ती गरीब विद्यार्थ्यांच्या फंडाला दिली व ते अक्षरशः अकिंचन झाले. एका विद्यार्थ्याने त्यांना एक घोंगडी दिली होती. त्यांची म्हणून तेवढीच एक वस्तू अंगावरच्या कपड्यांखेरीज होती. याच दिवशी स्वामीजींनी चार घरे भिक्षा मागून उदरनिर्वाह करण्यास प्रारंभ केला. सकाळची प्रार्थना झाली की ते चक्क हातात झोळी घेऊन हिप्परग्याला चार घरे भिक्षा मागत. त्यात जे काही येत असे त्यातही ते जवळ जो कोणी असेल त्याला सहभागी करीत. 'तेन त्यक्तेन भुंजीथाः' हा औपनिषदिक आदर्श त्यांनी अशा रीतीने गिरविण्यास प्रारंभ केला. स्वामीजी व त्यांचे सहकारी अंबाजोगाईस म्हणजे तेव्हाच्या मोमिनाबादला आले व जोगाईच्या हॉलमध्ये अशाच त्यागवृत्तीने राहू लागले. संस्थेसाठी कर्व्यांनी जगभर भीक मागितली, परंतु स्वामीजींचा विशेष असा की, त्यांनी संस्था तर जोपासल्याच परंतु आपली उपजीविकाही चार घरांतील भिक्षेवर केली. जोगाईच्या हॉलमध्ये हे असे शिक्षक व

खेड्यापाड्यांतून आलेले त्यांचे सर्व जातिधर्मांतील विद्यार्थी ' सहनाववतु, सहनौभुनक्तु 'चे व्रत प्रत्यक्षात आणताना अनेकांनी पाहिले. याच त्यागातून स्वातंत्र्याची ऊर्मी प्रज्वलित झाली व शिक्षणक्षेत्र खऱ्या अर्थाने कामी आले.

❦ ❦

# ५

# शिक्षण क्षेत्रातून प्रत्यक्ष राजकारणाकडे

हिप्परग्याच्या निवासी शाळेत विद्यार्थ्यांचे चारित्र्य घडविण्याचे जे प्रयोग चालू होते, त्याला कशी खीळ बसली हे आपण आधीच्या प्रकरणात बघितले. या संस्थेतील संचालकांत व शिक्षकांत मतभेद वाढत गेले. शिक्षकांच्या एका गटाने आधीच हिप्परगे सोडून अंबाजोगाई जवळ केले होते. स्वामीजी त्यांच्यानंतर हिप्परग्याला फार तर वर्षभरच राहू शकले. अखेरीस ते आणि बाबासाहेब परांजपे १९३६ ला अंबाजोगाईस येऊन दाखल झाले. हिप्परग्याचे प्रयोग अंबाजोगाईला चालू झाले, परंतु परत कष्ट आणि अडचणी वाढत गेल्या.

अंबाजोगाईचीच निवड का म्हणून केली? असा प्रश्न पडणे स्वाभाविक आहे. एकतर या वेळेपर्यंत स्वामीजी हैद्राबादभर व मराठवाड्यात फारसे माहीत झालेले नव्हते. राजकीय जागृती हळूहळू वाढत होती, परंतु तिचा परीघ अजून तरी फार मर्यादित होता. अंबाजोगाईला योगेश्वरी शिक्षणसंस्थेच्या नावाने एक शिक्षणसंस्था आधीच कायम झालेली होती. या संस्थेची फक्त एक प्राथमिक शाळा होती. मात्र अंबाजोगाईला जागृत कार्यकर्त्यांचा गट जमण्याची शक्यता होती. तेथील काही व्यक्तींनी स्वामीजींच्या मागे लकडा लावलेला होता की, त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी मोमिनाबादी यावे. (अंबाजोगाईचे पूर्वीचे नाव मोमिनाबाद असे होते. पोलिस कारवाईनंतर संयुक्त महाराष्ट्र झाल्यावर ते बदलून अंबाजोगाई झाले) प्राथमिक शाळेला हाताशी धरून हायस्कूलपर्यंतचे वर्ग काढावेत आणि निजाम सरकार-

कडून परवानगीसाठी प्रयत्न करावा. स्वामीजींनी फक्त एक अट घालून बघितली होती. मोमिनाबादच्या मित्रांनी महिन्याकाठी शंभर रुपये जमवून देण्याची व्यवस्था करावी. ती झाली की मग पुढचे बघू. स्वामीजींची ही अट लगेच पूर्ण झाली व ठरल्याप्रमाणे प्राथमिक शाळेला लागूनच योगेश्वरी नूतन विद्यालय या नावाचे हायस्कूल काढण्याचे ठरले. प्रश्न आता विद्यार्थ्यांचा होता. ज्या शाळेला सरकारी परवानगी नव्हती, ज्या शाळेतील शिक्षकांवर सरकारची वक्रदृष्टी होती व राज-द्रोहाच्या नावाखाली जी शाळा केव्हाही बंद केली जाण्याची शक्यता होती त्या शाळेत पालक मुले कसे पाठविणार? प्रश्न तसा फार बिकट होता. परंतु अंबेजोगाईला आलेले शिक्षक नवे घडविण्याच्या ईर्षेने पेटलेले होते. त्यांनी ठरविले की आपण आधी शाळेसाठी देणग्या मागण्याऐवजी जाऊन मुलेच मागू या !

स्वामीजींचे सहकारी व पुढे हैद्राबादच्या स्वातंत्र्य आंदोलनाचे प्रेरणास्थान बनलेले बाबासाहेब परांजपे या संबंधी आठवण सांगताना एकदा असे म्हणाले होते की, बहुधा रामायण काळातील वशिष्ठांनंतर आम्हीच प्रथमतः पालकांच्याकडे मुले द्या अशी याचना करावयाला निघालो होतो. असुरांच्या निर्दालानासाठी व आपल्या आश्रमाच्या रक्षणासाठी वशिष्ठांनी अयोध्यापती राजा दशरथापाशी सैन्य मागितले नाही की धनदौलत मागितली नाही. वशिष्ठ त्रिकालदर्शी होते की नाही कोण जाणे परंतु ते दूरदर्शी जरूर होते. देशातील युवाशक्ती जागृत झाली व दोन हात करण्यासाठी आपल्या पायावर उभी राहू शकली तरच असत्याचे पारिपत्य होईल व सत्याचे रक्षण होईल. राजेरजवाडे व समर्थ सिंहासने अमंगळाच्या निर्दालनाचे काम करू शकणार नाहीत वशिष्ठांच्या ठिकाणी असलेल्या याच दूरदर्शी विश्वासाने आम्ही घरोघरी गेलो व तुमची मुले आम्हाला द्या. आम्ही तुम्हाला उज्ज्वल भवितव्याची हमी देतो असे आम्ही पालकांना विनवू लागलो. बाबासाहेब ही आठवण सद्गदित अंतःकरणाने सांगतात व म्हणतात की, एका संन्याशाचा परिवार वाढत गेला. वातावरणात भीती तर होतीच. परंतु त्याचबरोबर या भीतीवर मात करण्याचे धैर्यही

निर्माण होत होते. अंबाजोगाईतच असे पालक निघाले की, ज्यांनी स्वामीजींच्या झोळीत आपली मुले टाकली. हळूहळू ही बालचमू वाढत गेली. वीस पंचवीस करीत करीत, संस्था शंभरावर आली.

वर्षभरात हायस्कूलपर्यंतचे वर्ग तर उघडले गेले, परंतु दहावीची परीक्षा उस्मानिया विद्यापीठ घेत असे. सरकारी परवानगी नसेल तर परीक्षा देणार कशी ? शाळेची परवानगी मिळविणे व ती मिळविण्या-साठी सरकारशी भांडत राहणे या प्रश्नाभोवती प्रतिकाराच्या शक्ती केंद्रित होऊ लागल्या. यातून अनेक कल्पना पुढे आल्या. मुलांना शेजारच्या सोलापूर अथवा पुणे यांपैकी कुठेतरी न्यावे व तेथे परीक्षेला बसवावे, अथवा सरहद्दीवरच हायस्कूल काढावे असे अनेक पर्याय सुचविण्यात आले. स्वामीजींचा निर्धार झाला होता, की आता जे काही करावयाचे असेल ते याच भूमीत होईल.

स्वामीजींनी आपल्या आठवणींच्या पुस्तकात यासंबंधीची हकीगत सांगितली आहे. हैद्राबाद ही तेव्हा निजामी संस्थानाची राजधानी होती. सरकार-दरबारी वजन असणारी मंडळी हैद्राबादी होती. या मातबरांना भेटून शाळेसाठी परवानगी मिळवावी असे स्वामीजींनी ठरविले व ते त्याप्रमाणे हैद्राबादी गेले. अनेक बडयांना भेटले, यांपैकी बहुतेक लोक नेमस्त विचारांचे व शासनाच्या कलाने घेणारे होते. स्वामीजींच्या शाळेत व त्यांच्या प्रयत्नांत या लोकांना बंडखोरी दिसली असल्यास नवल नाही. जवळ जवळ सर्वांनीच त्यांना निराश केले व हा प्रयत्न सोडून देण्याचा सल्ला दिला. हैद्राबादी तेव्हा वामन नाईक यांचा बराच दबदबा होता. संस्थानात राष्ट्रीय स्वातंत्र्याचे बीज पेरण्याचा प्रयत्न ज्या थोडया व्यक्तींनी केला त्यांत स्वर्गीय वामन नाईकांचा क्रम आरंभालाच लागतो. त्यांच्यावर लोकमान्य टिळकांचा प्रभाव होता. बेळगावी झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाला ते स्वयं-सेवकांसह हजर होते. इतकेच नव्हे तर बेळगाव कॉंग्रेसमधील भोजनाच्या व्यवस्थेचे काम त्यांनी स्वतःकडे घेतले होते. त्यांनीच हैद्राबादेत कॉंग्रेसची शाखा कायम करण्याचा प्रयत्न केला.

स्वामीजी वामन नाईकांना भेटले व त्यांनी शाळेविषयीच्या अडचणी त्यांच्या कानावर घातल्या. वामन नाईकांनी फक्त एकच प्रश्न विचारला, ‘ परवानगी मिळाली नाही तर तुम्ही तुरुंगात जाण्यास तयार आहात काय ? ’ स्वामीजींची तशी तयारी होतीच. त्यांना तसे कोणी विचारलेच नव्हते. किंबहुना निजामी सत्ता उखडून त्याऐवजी जनतेची अधिसत्ता कायम करण्यासाठी पुढच्या काळात सर्व निजामी तुरुंग भरून काढण्याचा पराक्रम ज्या स्वामीजींच्या नेतृत्वाने केला त्यालाच वामन नाईकांनी प्रश्न टाकला होता. होकारार्थी उत्तर मिळाल्यानंतर वामन नाईकांनी प्रयत्न केला व त्यांच्या प्रयत्नांना यश मिळाले. आरंभी तात्पुरती व सशर्त परवानगी मिळाली, परंतु पुढे स्वामीजी व त्यांची शाळा सरकारला मागे मागे रेटीत राहिले व सरकार एकेक पाऊल काढते घेऊ लागले.

अंबाजोगाई येथे सरकारतर्फे एक माध्यमिक शाळा चालत असे. स्वामीजी येण्याच्या आधी मोमिनाबादच्या नागरिकांनी सरकारकडे अर्ज केला होता की, सरकारी शाळेत हायस्कूलचे वर्ग काढावेत. शासनाने हा अर्ज अर्थातच नामंजूर केला, परंतु पुढे स्वामीजींच्या शाळेची भरभराट होऊ लागली व संपूर्ण मराठवाड्यातून मुले अंब्याच्या शाळेत जाऊ लागली तेव्हा शासनाने एक नवाच डाव खेळून पाहिला. योगेश्वरी नूतन विद्यालयातील मुलांची संख्या कमी व्हावी म्हणून शासनाने सरकारी शाळेचे रूपांतर हायस्कूलमध्ये केले. सरकारी शाळेत फी नाममात्र होती. योगेश्वरीची फी त्या मानाने जास्त होती. सरकारचा समज असा की, योगेश्वरींतील मुले कमी होतील. परंतु झाले उलटेच. सरकारची जसजशी स्वामीजींच्या या शाळेवर वक्रदृष्टी होऊ लागली तसतशी लोकांची सहानुभूती वाढत चालली. ‘ की तोडिला तरू फुटे आणखी भराने ’ या न्यायाने अंबाजोगाईच्या शाळेतील मुलांची संख्या ७–८ शेंच्या जवळपास वाढली. अंबाजोगाई हे तसे छोटेसे व आडवळणाला असलेले गाव. संपूर्ण बीड जिल्ह्यात परळीचा अपवाद सोडला तर रेल्वे लाईन नव्हती. आजही नाही. अशा गावी एवढ्या मुलांची व्यवस्था काय करणार ? संस्थेलाच वसतिगृह काढावे लागले. हे वसतिगृह अत्यंत

साधे, परंतु स्वच्छ व टापटिपीचे होते. बोलता बोलता ही शाळा व तिची वसतिगृहे तेव्हाच्या हैद्राबाद संस्थानात जनतेच्या आकर्षणाची केंद्रे बनली.

योगेश्वरीच्या शिक्षकवृंदात कडवे राष्ट्रभक्त व स्वातंत्र्यवादी जसे होते तसेच निरनिराळ्या विषयांचे तज्ज्ञही होते. तेव्हा हैद्राबादी शिक्षणाचे माध्यम माध्यमिक स्तरापासून विद्यापीठ शिक्षणापर्यंत उर्दूच होते. शिवाय जो अभ्यासक्रम होता तोही अत्यंत विकृत व पक्षपाती. इतिहासाचा तर भयंकर विपर्यास करण्यात आला होता. लहान वयापासूनच पक्षपाताला प्रारंभ होत असे.

स्वामीजी, बाबासाहेब वगैरे जे शिक्षक अंबाजोगाईस आले होते त्यांनी आरंभापासून उर्दूचा अभ्यास केला व ते उर्दू माध्यमातून शिक्षण देऊ लागले. सरकारला हे देखवले नाही. त्याने उर्दू शिक्षणासाठी उर्दू मातृभाषा असणारांची म्हणजे मुस्लिमाची नेमणूक करण्याची अट घातली. त्यातून स्वामीजींच्या संस्थेने असा मार्ग काढला की, आपल्या शाळेतील काही शिक्षक उर्दू आणि फारसीच्या शिक्षणासाठी उत्तर प्रदेशात लखनऊस पाठविले. तेथे त्या वेळी अदीब आलिम व मुन्शी फाजिल या पदवी परीक्षा होत. या परीक्षा पास होऊन आलेले शिक्षक उर्दू शिकवू लागले तरी सरकारचे समाधान झाले नाही. मग वायव्य सरहद्द प्रांतातून उर्दू मातृभाषा असलेले एक जे. एन्. शर्मन् नावाचे गृहस्थ स्वामीजींना येऊन मिळाले. सरकारचे तोंड बंद झाले. परंतु पुढे सरळ सरळ राजकीय लढ्यालाच तोंड लागले.

स्वामीजींच्या वास्तव्यामुळे व या संस्थेतील शिक्षकांच्या प्रखर ध्येयनिष्ठेमुळे मोमिनाबादी राजकीय चळवळीचे एक केन्द्रच निर्माण होऊ लागले. पुढच्या काळात ख्याती पावलेले गांधीवादी, साम्यवादी, रॉयवादी आणि समाजवादी याच संस्थेतून बाहेर पडले. जीवनाची विविध क्षेत्रे ज्यांनी आपल्या बुद्धिमत्तेने, व्यासंगाने आणि अभ्यासूवृत्तीने पादाक्रांत केली व लौकिक अर्थाने जे मोठमोठ्या पदांवर आरूढ झाले, असे स्वामीजींचे कित्येक विद्यार्थी याच संस्थेने निर्माण केले.

मोमिनाबाद हे राजकीय आंदोलकांचे एक आश्रयस्थानही बनत गेले. स्वामीजींच्या मागे त्यांच्या स्नेह्यांचा व सहकाऱ्यांचा आग्रह चालूच होता की, त्यांनी आता प्रत्यक्ष सक्रिय राजकारणात यावे. असा आग्रह करणारांत आनंद कृष्ण वाघमारे प्रमुख होते. स्वामीजींनी आपल्या आठवणीमध्येच अशी नोंद केली आहे की, त्यांना राजकारणात आणणारे आ. कृ. वाघमारे हेच पहिले गृहस्थ होते.

शाळेच्या परवानगीच्या निमित्ताने स्वामीजींचे हैद्राबादी बरेच जाणे येणे होत राहिले. हैद्राबादच्या काही मातबर नेमस्त मंडळींनी हैद्राबाद संस्थानात शिक्षण परिषद कायम केली होती. या परिषदेमध्ये शैक्षणिक प्रश्नांचाच ऊहापोह केला जात असे. अशी एक परिषद हैद्राबादी १९३७ साली झाली. काशीनाथराव वैद्य, लक्ष्मणराव गानू, रामचद्रराव अंतू आदी लोक या परिषदेचे प्रमुख नेते होते. काशीनाथराव वैद्य पुढे हैद्राबाद विधानसभेचे सभापती झाले. त्यांना स्वामीजींनी या शिक्षण परिषदेस मराठवाड्याचे प्रतिनिधी म्हणून यावे व तेथे बोलावे असा आग्रह केला. त्याप्रमाणे स्वामीजी गेले. त्याच सुमारास मेकेन्झी स्कीम नावाची शैक्षणिक योजना तयार करण्यात आली होती. स्वामीजींनी त्या योजनेचे वाभाडे काढले व या निमित्ताने सरकारच्या शैक्षणिक धोरणा-वर त्यांनी प्रखर टीका केली. स्वामीजींची ही टीका मवाळांना परवडणारी नव्हती. तशीच सरकारच्या ती वर्मी झोंबणारी होती. स्वामीजी व त्यांची शाळा हे या वेळेपासून अधिकच सरकारी रोषास पात्र ठरले.

१९३६ ते ३८ हा काळ तेव्हाच्या हैद्राबादच्या जीवनात मोठा महत्त्वाचा व परिवर्तनाचा काळ ठरला. पुढच्या लहान–मोठ्या स्थित्यंतरांची अनेक प्रसादचिन्हे याच काळात एकेक करून उजागर झाली. निजामी संस्थानात तेव्हा कसलेच स्वातंत्र्य नव्हते. साधे धार्मिक उत्सवही सरकारी परवानगीवाचून घेता येत नसत. सभांवर बंदी होती. राजकीय व अन्य सभांसाठी शासनाने गश्ती निशाण ५२/५३ लागू करून भाषणस्वातंत्र्यावर कडक निर्बंध लादले होते. व्यायामशाळा, आखाड, शाळा, गणेशोत्सव, दसऱ्याच्या मिरवणुका, धार्मिक दिंड्या,

आर्यसमाजी होमहवन वगैरेंवर बंधने लादलेली होती. या जाचामुळे लोकांच्या भावना ताणल्या जात असत. छोटेसे कारणही हिंदू-मुस्लिमांत दंगे होण्यासाठी पुरत असे. होळी, दसरा, गणेशोत्सव, नाथषष्ठी आदींच्या निमित्तावरून बरेच दंगे झाले. हैद्राबाद शहरात झालेला धूळपेठवा दंगा खूपच गाजला. तोही याच सुमारास झाला. स्वातंत्र्याच्या या जणू प्रसूतिवेदनाच होत्या. हा सर्व असंतोष संघटित करणे आवश्यक होते. त्याला राजकीय अधिष्ठान देणेही अगत्याचे होते. अन्यथा हा असंतोष हिंदु–मुस्लिम जातीय दंगलीमध्येच संपून जाईल व लोकक्षोभाला जातीय तणाव ग्रासून टाकतील हे उघड दिसत होते.

आंध्रमध्ये म्हणजे हैद्राबाद संस्थानात तेलगूभाषिक जो भाग होता व ज्याला तेलंगण म्हटले जात असे तेथे पूर्णतया अराजकीय स्वरूपाची एक संस्था आंध्र जनसंघ म्हणून १९२२ मध्येच स्थापन झाली होती. पुढे तिचेच रूपांतर आंध्र परिषदेत झाले. ही संस्था (आंध्र जनसंघ) तेलंगण भागात शैक्षणिक व सांस्कृतिक कार्य करण्यासाठीच स्थापन झाली होती. प्रतिकूल परिस्थितीतही या संस्थेने तेलंगण भागात वाचनालयाचे बरेच मोठे जाळे तयार केले. मात्र ही संस्था राजकारणापासून कटाक्षाने अलिप्त राहिली.

इकडे सोलापुरी स्वामीजी व त्यांच्या काही सहकाऱ्यांनी शंभर क्रांतिकारी तरुण संघटित करण्याचा संकल्प सोडला होता. हिप्परग्याचे अनंतराव कुलकर्णी व मराठवाडा नियतकालिकाचे संस्थापक आ. कृ. वाघमारे यांनी पुढाकार घेऊन याच सुमारास महाराष्ट्र संघ कायम केला. मराठवाड्याच्या काही प्रमुख गावी या महाराष्ट्र संघाची सभासद नोंदणी करण्यात आली होती. तुरळक शाखाही काढल्या जात होत्या.

योगायोग असा की, हैद्राबाद संस्थानात कन्नडभाषी जे तीन जिल्हे (गुलबर्गा, रायचूर व बीदर) होते तेथेही स्वातंत्र्याचे वारे खेळू लागले होते. तेलंगण, मराठवाडा आणि कर्नाटक या तीनही भागांत समान विचार आणि ऊर्मी उसळू लागल्या होत्या. समान दुःख

आणि समान गुलामीमुळेच हे झाले. १९३७ साली कर्नाटक परिषदेचे पहिले अधिवेशन हैद्राबादीच झाले.

हैद्राबादेत झालेल्या शिक्षण परिषदेमुळे तेव्हाच्या संस्थानातील राजकारणाच्या क्षितिजावर स्वामीजींच्या रूपाने एक नवाच तारा उदयाला आला. शिक्षण परिषदेतील स्वामीजींचे भाषण सरकारच्या जसे वर्मी झोंबले तसेच सर्वसामान्य लोकांना बेहद्द आवडले. कसलीही भीती न वाळगता, परिणामांची तमा न करता कोणी तरी सरकारला सुनावणारा राज्यात आहे हे ऐकून लोकांना धीर आला, विशेषत: राजधानीतील युवकांमध्ये जो असंतोष सुप्तावस्थेमध्ये धुमसत होता, त्याला एकदम वाट मिळाली.

उस्मानिया विद्यापीठ हे निजामाचेच नव्हे तर राज्यभर सत्ता गाजविणाऱ्या हितसंबंधी सरंजामी वर्गाचे व नोकरशहांचे लाडके विद्यापीठ होते. सरंजामदारांना अनुकूल असे राज्यकर्ते व कारकून निर्माण करणारा तो एक उर्दू भाषेचा कारखाना होता. निवडक लोकांनाच तेव्हा विद्यापीठात प्रवेश होता. स्वातंत्र्याच्या आणि राजद्रोहाच्या विचारांना थोडासुद्धा प्रवेश विद्यापीठात मिळू नये अशी खबरदारी घेण्यात आली होती. काय मजाल होती की स्वामीजींसारख्या बंडखोराला या विद्यापीठात कोणी बोलावण्याचे धाडस करील. परंतु हे अघटित घडले. विद्यापीठातील मुस्लिम धर्मीय मुलांना पक्षपाताने विशेष वागणूक मिळत होती. त्यांना धार्मिक स्वातंत्र्य होते. किंबहुना त्यांच्यासाठीच केवळ धर्म होता. इतरांच्या धर्मांना स्थान नव्हते. या पक्षपाताचा नकळत परिणाम असा झाला की, हिंदू मुले हळु-हळू संघटित होऊ लागली. विद्यापीठातील हिंदू मुलांनी प्रथमत:च गोकुळ-अष्टमीला कृष्णजन्म साजरा करण्याचे ठरविले. त्यांनी या समारंभाचे प्रमुख पाहुणे म्हणून स्वामीजींनाच बोलावले. 'कृष्णाचा संदेश' या विषयावर स्वामीजींचे विद्यापीठात इंग्रजीतून भाषण झाले. त्या काळीही स्वामीजींच्या भाषणात अन्यायाविरुद्ध प्रखर भावना होती तसेच धर्म-निरपेक्षता, सर्वधर्मसमभाव आणि राष्ट्रवादाचे व्यापक आणि सर्व-संग्राहक अधिष्ठान यावर स्पष्ट भर होता. एक तर स्वामीजींना विद्या-

पीठात बोलावण्यात आले. नंतर त्यांचे भाषण झाले. या दोन घटना भावी काळाच्या संदर्भात फारच महत्त्वाच्या ठरल्या. हैद्राबादच्या राजधानीत स्वामीजींचा परिचय एक उगवता बंडखोर पुढारी, निष्ठेसाठी व मूल्यांसाठी सर्वस्व झोकून देणारा संन्यासी म्हणून घडून आला. हैद्राबाद शहरात ज्या छोटचामोठचा संस्था होत्या त्यांनी स्वामीजींना आवर्जून बोलावले. तरुणांच्या लहान-मोठचा सभा झडू लागल्या व युवकांची मने एकेक करून स्वातंत्र्यासाठी व निजामाच्या गुलामीच्या जोखडातून सुटण्यासाठी धडपडू लागली. स्वामीजींनी जणू एका मोठचा हिमखंडाला धक्का दिला होता व ती शिळा जागा सोडू लागली होती. बर्फ वितळू लागला होता.

याच सुमारास मराठवाडचात राजा राय किसन प्रसाद यांची जाहगीर असलेल्या परतूर या तालुक्याच्या गावी महाराष्ट्र परिषदेचे पहिले अधिवेशन घेण्याचे ठरले. हैद्राबाद शहरातील काही महाराष्ट्रीय नेत्यांनी एकत्र जमून महाराष्ट्र परिषद कायम केली होती. कर्नाटक आणि तेलंगणमध्ये परिषदा कायम झाल्याच होत्या. आंध्र जनसंघाने आंध्र परिषद हे नाव धारण केलेच होते. सर्व संस्थानाचे मिळून एक संघटन शासन उभे राहू देत नाही म्हणून या प्रादेशिक परिषदांचा आश्रय घ्यावा लागला. महाराष्ट्रीय नेमस्तांचे म्हणणे असे होते की, मराठवाडचातील परिषदेचे नावही महाराष्ट्र संघ असे न घेता महाराष्ट्र परिषद असेच घ्यावे. महाराष्ट्र संघ या नावाची संस्था १९३६–३७ च्या सुमारासच कायम झाली होती. याचा उल्लेख या आधी येऊन गेलाच आहे. परतूरला महाराष्ट्र परिषदेचे अधिवेशन घेण्याचे ठरले त्याचे मुख्य कारण असे होते की, परतूर ही जाहगीर होती. खालशात त्या गावचा अंतर्भाव नसल्याने तेथे महाराष्ट्र परिषदेच्या अधिवेशनास मंजुरी मिळणे सोपे होते. परतूर अधिवेशनाचे अध्यक्षपद परभणीचे वकील गोविंदराव नानल यांना देण्यात आले. स्वागताध्यक्षपदी घारे नावाचे परतूरचेच एक मातबर शेतकरी होते. हे महाराष्ट्र परिषदेचे पहिले अधिवेशन असल्याने हैद्राबादचे बरेच नामवंत उपस्थित होते. मराठवाडचाच्या सर्व भागांतून प्रतिनिधी आले होते. याच ठिकाणी मराठवाडचात उदयाला येऊ पाहणारा तरुणांचा एक मोठा गट

गोविंददास श्रॉफ व आनंदराव वाघमारे यांच्या नेतृत्वाखाली उपस्थित होता. महाराष्ट्र संघाची स्थापना करणारांत अनंतराव कुलकर्णी यांच्या-प्रमाणेच आ. कृ. वाघमारे यांचाही सहभाग होता. या दोघांनाही आरंभी असा संशय वाटला की, संघाचे नाव न घेता महाराष्ट्र परिषद असे नाव धारण करून हैद्राबादचे सरकारधार्जिणे नेमस्त पुढारी आपले राजकारण करीत असून लोकशक्ती जागृत होण्याचा मार्ग रोखीत आहेत. या लोकांची नंतर समजूत काढण्यात आली व सर्वांनीच परतूर परिषदेत भाग घेतला.

महाराष्ट्र परिषदेचे आरंभाचे स्वरूप स्पष्टपणे राजकीय नसले तरी तिने जबाबदार राज्यपद्धतीची मागणी केलेलीच होती. या अर्थाने ती राजकीय परिषदच होती. सरकारने तर तसेच मानले होते. स्वामीजी आपल्या मोमिनाबादच्या सहकाऱ्यांसह प्रथमतःच एका राजकीय परिषदेला हजर राहिले. त्यांचे या परिषदेत भाषण वगैरे झाले नाही. ते मूकपणे सर्व कार्यवाही न्याहाळीत होते. मात्र त्यांनी तेथे जमलेल्या जहाल युवकांशी संपर्क साधला होता. स्वामीजींनी परतूर अधिवेशनात प्रतिनिधींच्या जेवणाची व्यवस्था स्वतःकडे घेतली होती. त्यांचे मोमिनाबादचे सहकारी व विद्यार्थी स्वयंसेवक या व्यवस्थेच्या अग्रभागी होते. स्वामीजींचा सहभाग एवढाच होता. परंतु शासनाने आणि मराठवाड्यातील युवकशक्तीने बरोबर हेरले होते की, हैद्राबादच्या भावी राजकारणाचे नेतृत्व निर्भयपणे करू शकणारी एकच व्यक्ती आहे आणि ती म्हणजे स्वामी रामानंद तीर्थ–मोमिनाबादच्या योगेश्वरी नूतन विद्यालयाचे मुख्याध्यापक.

परतूर येथील जून १९३७ च्या महाराष्ट्र परिषदेनंतर स्वामीजींचा मराठवाड्यातील व हैद्राबादेतील राजकीय कार्यकर्त्यांशी संपर्क येऊ लागला. महाराष्ट्र परिषदेच्या कार्यकारिणीच्या एक–दोन बैठकाही मोमिनाबादी घेण्यात आल्या. या राजकीय संपर्काचे पर्यवसान पुढे असे झाले की, महाराष्ट्र परिषदेचे दुसरे अधिवेशन जून १९३८ मध्ये लातूरला घेण्याचा निर्धार झाला. परिस्थिती वेगाने पुढे पुढे दौडत होती. स्वामीजी राजकीय कार्यात उत्तरोत्तर गुंतत होते. परतूरलाच असे ठरले

होते की, परिषदेची घटना तयार करण्यासाठी जी तिघांची समिती नेमण्यात आली आहे तिने मसुदा तयार करावा व तो पुढील अधिवेशनात मंजूर करून घ्यावा. स्वामीजींनी परिषदेचे चिटणीसपद घ्यावे असा त्यांना खूप आग्रह झाला, परंतु तेव्हा तरी त्यांनी नकार दिला. मात्र लातूर अधिवेशनात स्वामीजींना महाराष्ट्र परिषदेचे चिटणीसपद स्वीकारावे लागले. एकमताने त्यांची निवड झाली. अशा रीतीने ९ जून १९३८ ला स्वामीजींनी मोमिनाबादचा, योगेश्वरी नूतन विद्यालयाचा व शिक्षणक्षेत्राचा कायमचाच निरोप घेतला.

# ६

# स्टेट कॉंग्रेसची स्थापना व तुरुंगवास

स्वामीजी मोमिनाबादच्या नूतन विद्यालयाचे मर्यादित क्षेत्र सोडून प्रत्यक्ष राजकारणात कसे आले हे आपण या पूर्वीच्या प्रकरणात पाहिले. परतूर येथे महाराष्ट्र परिषदेचे पहिले व लातूर येथे दुसरे अधिवेशन झाले. लातूर अधिवेशनाची महत्त्वाची फलश्रुती जर काही असेल तर ती म्हणजे स्वामीजींनी महाराष्ट्र परिषदेचे चिटणीसपद स्वीकारणे व एका नव्या राज्यव्यापी संघर्षाचा प्रारंभ होणे ही होय. स्वामीजी अंबाजोगाई सोडून हैद्रावादी राहावयास गेले त्याआधीची लातूर परिषदेतील एक घटना उल्लेखनीय आहे. हैद्राबाद संस्थानाच्या राजकीय इतिहासात स्वामीजींच्याकडे जी भूमिका आली ती निरपवादपणे संघर्षाचीच आली असे दिसते. स्वामीजी वृत्तीने अत्यंत मृदू. कोणाला ताडकन टाकून बोलणे त्यांना कधी जमलेच नाही. त्यांच्या वक्तृत्वामध्ये भावना हेलावून सोडणाऱ्या व कार्यप्रवृत्त करणाऱ्या वक्तृत्वाचे गुण निःसंशय होते, परंतु त्यांची शैली आर्जवी-एकाद्या शिक्षकाने विद्यार्थ्याला विषय समजावून द्यावा अशी नितळ. कठोर व्यंजने जणू त्यांच्यासाठी नव्हती. अशा या मृदुहृदयी माणसाकडे इतिहासाने नेमकी संघर्षाची कामगिरी सोपविली. परिणामी संघर्ष यशस्वी तर झालेच परंतु संघर्षाचे व्रण नंतर कोणाच्याच मनावर शिल्लक राहिले नाहीत. याच संदर्भात लातूरची घटना नमूद करण्यासारखी आहे.

लातूर महाराष्ट्र परिषदेचे दुसरे अधिवेशन १९, २० आणि २१

मे १९३८ ला लातूर येथे घ्यावे असे ठरले होते. सरकारच्या अपेक्षेप्रमाणे श्री. श्रीनिवासराव शर्मा या संस्थाननिवासी मुल्की व्यक्तीची अध्यक्ष म्हणून निवड झाली होती. बाहेरच्या व्यक्तींशी व संस्थांशी संबंध ठेवू नये. यावर सरकारचा फार कटाक्ष होता. त्यावेळच्या नियमाप्रमाणे जाहीर सभा घेण्यासाठी कलेक्टराकडे लेखी अर्ज, किमान पंधरा दिवस आधी करावा लागत असे. तसा अर्ज करण्यात आला, परंतु सरकारने लवकर परवानगीच दिली नाही. त्यामुळे वातावरण आपोआप तप्त झाले. युवकांचे लक्ष लातूर अधिवेशनावर केंद्रित झाले. स्वामीजी व त्यांचे सहकारी आरंभापासून या अधिवेशनात भाग घेणार म्हणूनही या अधिवेशनाला एक वेगळेच महत्त्व प्राप्त झाले होते. कदाचित त्याचमुळे असेल, सरकारने परवानगी देण्याची टाळाटाळ केली. त्यामुळे मेमध्ये होणारे अधिवेशन जून १९३८ मध्ये घ्यावे लागले. सरकारने परवानगी दिली, परंतु काही अटी लादून. पहिली अट अशी की, परिषदेत होणारी भाषणे व ठराव आधी कलेक्टरांना दाखवून त्यांच्याकडून मंजूर करवून घ्यावेत. तरुणांचा विरोध येथूनच सुरू झाला. जे नेमस्त होते त्यांचे म्हणणे असे की, आत्ताच संघर्ष होऊ नये. प्रभाव त्यांचाच होता. अध्यक्षीय भाषणातून काही भाग वगळावा व मगच ते अध्यक्षांनी वाचावे अशी अट कलेक्टरांनी घातली. नंतर ठरावामध्ये दोन ठराव अधिवेशनात मांडू नयेत असा कलेक्टरांनी हुकूम दिला· पैकी एक ठराव होता हैद्राबादी धुळपेठला झालेल्या व इतरत्र झालेल्या जातीय (हिंदू–मुस्लिम) दंग्यांची नि:पक्ष चौकशी व्हावी व त्यासाठी एक मंडळ नेमावे. दुसरा ठराव नागरी स्वातंत्र्यासंबंधीचा होता. कलेक्टर ऐकेनात व इकडे अधिवेशनातील तरुण मंडळी अडून बसली. ते स्वामीजींच्या नेतृत्वाखाली संघटित झाले. जहालांमधेही दोन प्रवाह स्पष्ट दिसून येत होते. एका प्रवाहाचे म्हणणे असे की, सरकारचे आदेश पाळू नयेत. जे होणार असेल ते होवो, अदेश मोडूनच सरकारला प्रत्युत्तर द्यावे. दुसऱ्याचे म्हणणे असे की, असा एकाकी लढा देऊन शक्ती वाया दवडू नये. निषेध म्हणून अधिवेशन स्थगित करावे व पुढच्या अधिवेशनाची आत्ताच घोषणा करून सरकारी आदेश धुडकावण्याची तयारी करावी. स्वामीजी

अर्थातच दुसऱ्या मताचे होते. या गटामध्ये परतूर अधिवेशनापासून परिषदेत आलेले तरुणांचे प्रतिनिधी गोविंदभाई श्रॉफ, आ. कृ. वाघमारे, स. कृ. वैशंपायन, चंद्रगुप्त चौधरी आदींचा समावेश होता.

सरकारी आदेश आणि प्रत्यक्ष अंमलबजावणी यांमध्ये एवढा घोळ झाला की, अध्यक्षीय भाषणातील काही भाग कलेक्टरांनी एकीकडे वगळायला तर सांगितला, परंतु त्याचवेळी अध्यक्षीय भाषणाच्या छापील प्रती जशाच्या तशा जमलेल्या प्रतिनिधींत वाटायची परवानगी दिली. ज्या दोन ठरावांविषयी कलेक्टर आग्रही होते त्यांपैकी एक प्रतिनिधींच्यापुढे मांडूनही झाला होता व तो संमतही झाला होता. तथापि सरकारचे एकंदर धोरण शासनाच्या विरुद्ध जाणारा असंतोष दडपून टाकण्याचे होते. तासातासाला अध्यक्ष शर्मा व परिषदेचे निवडक नेते कलेक्टरांना येऊन सांगत. शेवटी बहुसंख्य लोकांना या प्रकाराचा उबग आला. सरकारी कागदपत्रात यासंबंधी असे नमूद करण्यात आले आहे की, परिषदेचे हे अधिवेशन स्थगित करावे, का बंधने स्वीकारून चालू ठेवावे यावर मतदान घेण्यात आले. जमलेल्या प्रतिनिधींपैकी १३३ जणांनी अधिवेशन स्थगित करण्याच्या बाजूने मते दिली तर फक्त ११ जण, असे निघाले की, ज्यांनी कलेक्टरांनी केलेल्या दुरुस्त्यांसह ठराव पास करून अधिवेशन चालू ठेवावे, अशी मते दिली. बहुमताने अधिवेशन स्थगित करण्यात आले व तेथेच पुढील अधिवेशन औरंगाबादी घेण्याची घोषणा करण्यात आली.

मात्र याच वेळी अधिवेशन गुंडाळले जात असताना पुढील कार्यक्रम काय असावा व संघटनेची दिशा कोणती ठेवावी हे ठरविण्यासाठी एक समिती मुक्रर करण्यात आली. महाराष्ट्र परिषदेचे नवनिर्वाचित चिटणीस म्हणून या समितीचे संयोजकत्व स्वामीजींकडेच देण्यात आले. त्यांच्याखेरीज काशीनाथराव वैद्य आणि दिगंबरराव बिंदू हे दोघे या समितीचे सदस्य म्हणून निवडण्यात आले.

**स्टेट कॉंग्रेसची स्थापना :**

हैद्राबाद संस्थानात तीन भाषांचे जे तीन विभाग होते त्यांत तीन

वेगवेगळ्या परिषदा स्थापन झाल्या व अराजकीय म्हणत म्हणत का असेना त्यांनी लोकांत वाढत जाणाऱ्या जागृतीला संघटना उपलब्ध करून दिली. परंतु अशा रीतीने वेगवेगळ्या संघटना बांधून कार्यभाग साधणार नाही याची जाणीव सार्वजनिक क्षेत्रातील कार्यकर्त्यांना होऊ लागली होती. सर्व संस्थानांसाठी एकच संघटना असावी आणि तिच्यामध्ये तिन्ही भाषिक विभागांतील लोकांचा समावेश असावा, त्याचबरोबर ही संघटना सरळ–सरळ राजकीय असावी याची निकड सर्वांनाच भासू लागली. प्रांतिक परिषदा या राज्यव्यापी संघटनेची जागा घेऊ शकत नव्हत्या. मवाळांपासून जहालांपर्यंत सर्वांचेच यावर एकमत होते.

मवाळांनीच या आधी पुढाकार घेऊन १९३८ च्या जानेवारीमध्ये हैद्राबादी एक, हैद्राबाद पीपल्स कव्हेन्शन म्हणून घेतले. या मेळाव्याचे अध्यक्षस्थान तेलंगणातील ख्यातनाम समाजसुधारक व नेते माडपाटी हनुमंतराव यांनी भूषविले होते. या मेळाव्याने पहिल्या प्रथम निजामाच्या छायाछत्राखाली जबाबदार राज्यपद्धतीची मागणी केली. याच सुमारास हरिपुरा येथे अ. भा. काँग्रेसचे अधिवेशन झाले होते. हैद्राबादच्या तिन्ही विभागांतून या अधिवेशनाला मोठ्या प्रमाणावर लोक हजर होते.

स्वामीजी लातूर महाराष्ट्र परिषदेचे अधिवेशन स्थगित करून हैद्राबादीच राहायला आले. मराठवाड्यात जे कार्यकर्ते स्वामीजींच्या नेतृत्वाखाली गोळा झाले होते त्यांची अशी ठाम भूमिका बनली होती की, प्रखर आंदोलन करावे लागेल. त्यासाठी राजधानीत जाऊन, तेथून शासनाला उघड आव्हान देणारी संघटना बनवावी लागेल. या लोकांच्या आग्रहामुळेच स्वामीजी हैद्राबादी गेले. पुढच्या दहा वर्षांत ज्यांनी संपूर्ण हैद्राबाद संस्थानातील जनतेचे प्रभावी नेतृत्व केले व निजामाचे तख्त गदगदा हलविले, त्या स्वामीजींना राहण्यासाठी तेव्हा कोणी एक खोलीही देण्यास तयार नव्हते. त्यांच्यापाशी पैशाचेही बळ नव्हते. स्वामीजींचे एक स्नेही सरकारी नोकरीत न्यायाधीश होते. त्यांनी आपल्या घरी स्वामीजींना थोडीशी जागा दिली. जेवणाखाण्याची व्यवस्थाही त्यांनीच केली. मवाळ मंडळी गबर होती. त्यांच्या दारी मोटारी

झुलत होत्या. सरकार दरबारी त्यांचे वजन होते. जी काय थोडी बहुत राजकीय चळवळ तेव्हा होती ती या मवाळांच्याच स्वाधीन होती. ती आपल्या ताब्यात राहावी असाच त्यांचा प्रयत्न असे. स्वामीजी या मंडळींच्या घराचे उंबरठे झिजवीत; परिस्थितीची त्यांना कल्पना देत व राजकीय संघटन त्वरेने स्थापून जनशक्ती संघटित करावी असे आवर्जून सांगत. रात्री-बेरात्री, पायी या पुढाऱ्यांच्या दारांशी स्वामीजी ताटकळत बसून राहत व जेव्हा बोलावणे येईल, तेव्हा त्यांच्याशी विचारविनिमय करीत. तेव्हा स्वामीजी म्हणजे काहीच नव्हते. तथापि परिस्थितीची गरज म्हणून १९३८ च्या जुलै महिन्यात प्रातिनिधिक बैठक होऊन हैद्राबाद स्टेट काँग्रेसची स्थापना करण्यात आली. एक हंगामी समिती नेमून तिने महिनाभराच्या आत स्टेट काँग्रेसचे सभासद नोंदवावेत आणि या सभासदांची एक आमसभा घेऊन रीतसर पदाधिकारी निवडावेत असे ठरविण्यात आले. आमसभेची तारीखही ९ सप्टेंबर १९३८ निश्चित करण्यात आली. कोणाची इच्छा काही असो, घटना एका मागोमाग एक अशा वेगाने घडून येऊ लागल्या. कालचक्रानेच जणू गती धारण केली होती. रात्रीच्या गर्भातून उष:काल यावा अशा नियत पद्धतीने घटनाचक्र फिरू लागले.

सभासद नोंदणी होऊन आमसभा होण्यापूर्वी हंगामी समितीने एक सविस्तर आवाहन प्रसिद्ध केले. त्यात स्टेट काँग्रेसची ध्येयधोरणे नमूद करण्यात आली. स्टेट काँग्रेसचा लोकशाहीवर विश्वास असल्याने निजामाच्या व आसफजाही घराण्याच्या छायाछत्राखाली जबाबदार राज्यपद्धतीची मागणी अनिवार्यच होती. शिवाय काँग्रेसचे स्वरूप राष्ट्रवादी व धर्मनिरपेक्ष असेल अशी ग्वाही देण्यात आली. हे आवाहन प्रसिद्ध झाले आणि दोन महिन्यांचा अवधी असताना अवघ्या महिनाभरात बाराशेपर्यंत सभासद नोंदणी करण्यात आली. ही सभासद नोंदणी अर्थात केवळ हैद्राबाद व सिकंदराबाद या दोन शहरांतच नव्हती तर मराठवाडा, तेलंगण व कर्नाटकमध्ये करण्यात आली होती. स्वामीजी व त्यांच्या मागे संघटित झालेल्या शक्तींचे अस्तित्व प्रथमत:च जाणवले, ते द्रुतगतीने झालेल्या सभासद नोंदणीच्या निमित्ताने. जणू स्वामीजी व

त्यांचे सहकारी संकल्पित स्टेट कॉंग्रेसला पुढे पुढे खेचीत नेत होते आणि तथाकथित राजनिष्ठ व नेमस्त तिला आपल्या ताब्यात ठेवण्याची पराकाष्ठा करीत होते. स्वामीजी अशा रीतीने संघर्षाच्या मुळाशीच येऊन ठेपले होते.

आधी ठरल्याप्रमाणे ९ सप्टेंबर १९३८ ला स्टेट कॉंग्रेसच्या सभासदांची आमसभा होणार होती. ही सभा निजाम सरकारच्या विश्वासातले कर्नाटकातील नेमस्त पुढारी जी. रामाचार्य यांच्या बंगल्यात घेण्याचे ठरले होते. अकबर हैदरी तेव्हा हैद्राबाद संस्थानाचे पंतप्रधान होते. त्यांनी रामाचार्य यांना समक्ष बोलावून सांगितले की, आमसभा बोलावू नये. बोलावली तर तो कायदेभंग मानला जाईल. म्हणजे रामाचार्य यांना ही सरळ सरळ धमकीच होती. सरकारने सभेच्या आदल्या दिवशी म्हणजे ८ सप्टेंबर १९३८ ला खास फर्मान काढून जन्माला येण्यापूर्वीच स्टेट कॉंग्रेसवर बंदी टाकली.

या आधी आणखी एक घटना घडून आली. सरकार आणि नेमस्त मंडळी परस्परांच्या संगनमताने म्हणा, की स्वतंत्रपणाने म्हणा, काही डावपेच खेळत होती. नेमस्तांना अशी लालूचही दाखविण्यात आली होती की, सर्व जातिधर्माचे व विशेषतः मुस्लिम लोक ज्या संस्थेत सामील होतील तिला शासन मान्यता देईल. म्हणून रामाचार्य यांना हाताशी धरून त्या दिशेने प्रयत्न चालू होते. त्याच वेळी आंध्र परिषदेचे एक नेते व 'रय्यत' या उर्दू दैनिकाचे संपादक एम्. नरसिंगराव यांनी आपण होऊन मजलिसे इत्तेहादुल मुस्लिमीन या कडव्या जात्यंध संघटनेचे नवे अध्यक्ष नबाव बहादुर यार जंग यांच्याशी पत्रव्यवहार सुरू केला होता. हिंदु-मुस्लिमांचे प्रश्न कोणते, ते सोडविण्याच्या बाबतीत उभयपक्षी काही तोडगा काढता येतो काय ? या दिशेने प्रयत्न करण्यासाठी हा पत्रव्यवहार होता. बराच पत्रव्यवहार झालाही मात्र मुख्य गाडे हिंदु-मुस्लिमांना कायदेमंडळात व मंत्रिमंडळात किती प्रतिनिधित्व असावे यावर अडले. ऐतिहासिक परंपरेने मुस्लिम हैद्राबाद राज्याचे शासनकर्ते आहेत. बादशहा हा केवळ त्यांच्या अधिकारांचा प्रतीक आहे. मुस्लिम धर्मानुसार प्रत्येक मुसलमान राजा आहे. अनल् मलिक या नावाने हा

सिद्धांत ओळखला जातो. एम्. नरसिंगराव यांचे म्हणणे असे की, बहादुर यार जंग यांनी तत्त्वशः जबाबदार राज्यपद्धतीच्या कल्पनेला मान्यता दिली होती. वाटाघाटी प्रतिनिधित्वापाशी थांबल्या होत्या. त्यामुळे नरसिंगराव यांचाही असा आग्रह होता की, आपण गडबड करू नये. बहादुर यार जंग तयार झाले तर उभय जातींच्या संमतीनेच जबाबदार राज्यपद्धती येईल व स्टेट काँग्रेसला मान्यताही मिळेल. तथापि त्यांना हे फार उशिरा कळाले की, बहादुर यार जंग व संस्थानी सरकार एक-मेकांशी संधान राखून आहेत व स्टेट काँग्रेसच्या पुढाऱ्यांना ते चाळवण्या देत आहेत. सरकारने नरसिंगराव व बहादुर यार जंग यांच्या दरम्यान जो पत्रव्यवहार झाला त्यात कुठवर एकमत झाले हे जाहीर करा अशी मागणी केली. कुणीकडून तरी स्टेट काँग्रेस अस्तित्वात येऊ द्यावयाची नाही हा सरकारचा डाव होता. इत्तेहादुल मुस्लिमीन सरकारला या कामी उपयोगी पडत होती.

आमसभा तर स्थगित झाली. परंतु या निमित्ताने जे लोक जमले त्यात स्वामीजी व त्यांच्या बरोबरचे जहाल नेतेही होते. या जहालांनी नेमस्तांच्या पडखाऊ धोरणावर हल्ला चढविला व सरळ सरळ सत्याग्रह लढा सुरू करण्याचा आग्रह धरला. तुम्हाला सरकारची भीती वाटते व तुमची सत्याग्रहाची तयारी नसेल तर तुम्ही राजीनामे द्या व स्टेट काँग्रेस आमच्या स्वाधीन करा असा खडा सवाल त्यांनी टाकला. नेमस्त सहजासहजी वळणारे नव्हते. त्यांनी सातवा निजाम मीर उस्मान अली यांच्या वाढदिवसाचा (सालगिराह) मुहूर्त साधून परत एक निवेदन काढले व स्टेट काँग्रेसवर जी बंदी टाकली ती उठ-विण्यासाठी सरकारने फेरविचार करावा अशी त्याद्वारे विनंती केली. सरकार या पुढाऱ्यांचे पाणी जोखून होते. शासनाने स्पष्ट नकार दिला. स्टेट काँग्रेसमध्ये मुसलमान नाहीत म्हणून ती जातीयवादी संघटना आहे आणि ती बाहेरच्या भारतातील इंडियन नॅशनल काँग्रेसशी संबंधित आहे. या दोन मुद्द्यांवर भर देऊन सरकारने आपली नकारात्मक भूमिका अधिक पक्की केली.

स्वामीजींच्या नेतृत्वाचा प्रवेश आणि त्याची घोडदौड याच

प्रसंगापासून सुरू झाली. नेमस्त दुबळे, सरकार कडवे व आडमुठे, मग करावयाचे काय ? स्वामीजींच्या नेतृत्वाखालच्या जहालांनी सरळ सांगून टाकले की, हंगामी समिती रद्द करून टाका. हैद्राबादच्या मुक्कामात स्वामीजींनी तेलंगण आणि कर्नाटक या प्रांतांत काही समविचारी तरुण हेरले होते. स्वामीजी त्यांच्याशी संपर्क ठेवूनच होते. मराठवाडा विभाग तर पूर्णपणेच स्वामीजींच्या मागे उभा होता. काशीनाथराव वैद्य वगैरे मवाळांना मानणारे जे थोडेबहुत लोक मराठवाड्यात होते, त्यांनीही स्वामीजींचे नेतृत्व स्वीकारले होते. या जहालांचा दबाव आला आणि स्टेट कॉंग्रेसची हंगामी समिती रद्द झाली. तिच्या जागी जी कृतिसमिती नेमण्यात आली तीच पुढे चालून स्टेट कॉंग्रेसची केंद्रीय कार्यकारिणी बनली.

आता कसोटी स्वामीजींची व जहाल नेतृत्वाची होती. बंदीहुकूम मोडावयाचा आणि गांधीजींच्या तत्त्वाप्रमाणे सत्याग्रह पुकारावयाचा या दिशेने आखणी सुरू झाली. स्वामीजींचा त्याच वेळी मराठवाड्यात झंझावती दौरा झाला. महत्त्वाच्या ठिकाणी गुप्त बैठकी झाल्या. स्वामीजींनी सर्वसाधारण जनतेला व विशेषतः तरुणांना आवाहन केले की, गुलामीच्या शृंखला तोडण्याच्या कामी त्यांनीच पुढाकार घेतला पाहिजे. अवघी जनता पारतंत्र्याच्या कर्दमात अडकून पडली असता कसला विद्याभ्यास आणि कसली शाळा-कॉलेजे घेऊन बसलात ? चौदिवाऱ्या सोडा व मैदानात या. स्वामीजींच्या सभांनी व त्यांच्या संदेशांनी अक्षरशः १८५७ च्या बंडातील भाकरीने जे कार्य केले तेवढा प्रचार केला. भीती दूर होऊन तरुण मुले, वकील, डॉक्टर, शिक्षक, सत्याग्रहात नावे नोंदवू लागले. मराठवाड्यात सत्याग्रहींची नोंदणीच फार मोठ्या प्रमाणावर झाली. ही शिबंदी पाठीशी घेऊन स्वामीजी हैद्राबादी गेले.

प्रश्न दोन होते. बंदी असलेल्या स्टेट कॉंग्रेसचे अध्यक्षपद कोणाला द्यावयाचे ? ती जोखीम कोण पत्करणार ? दुसरा प्रश्न सत्याग्रह कसा, कुठे व किती काळ चालू ठेवावयाचा ? आजपर्यंत ज्यांना सरकार-दरबारी व समाजात प्रतिष्ठा होती ते सर्व मवाळांच्या बाजूला होते.

स्वामीजींच्या मागे शक्ती मोठी होती. परंतु ती प्रतिष्ठितांची नव्हती. अशामध्येच स्वामीजी परभणीला गेले. तेथे मुकुंदराव पेडगावकर, श्रीनिवासराव बोरीकर या वकील मंडळींच्या मार्फत त्यांचा व गोविंदराव नानल यांचा परिचय झाला. नानल मोठे वकील होते. ते नुकतेच हैद्राबादी राहावयास गेले होते. हैद्राबादी जाऊन स्वामीजींनी त्यांना शब्द टाकला. स्वामीजी एक संन्यासी आहेत, त्यांचे म्हणणे कसे नाकारावयाचे ? थोडा विचार करून नानल यांनी संमती दिली. त्यांना याची पुरेपूर कल्पना होती की, ते स्टेट कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले की, त्यांना अटक होईल व त्यांना शिक्षा ठोठावण्यात येईल. नानल तसे शब्दाचे पक्के होते. त्यांनी स्वामीजींना शब्द दिला. सत्याग्रहाच्या पुढच्या तुकड्यांची व्यवस्था करून व आपल्या पश्चात सत्याग्रह चालविणारी भूमिगत यंत्रणा उभारून स्वामीजींनी कामास प्रारंभ केला. नानल यांचे अध्यक्षपद व त्यांची कार्यकारिणी जाहीर करण्याची तारीख २४ ऑक्टोबर १९३८ ही ठरली. त्याआधी स्टेट कॉंग्रेसची भूमिका स्पष्ट व्हावी म्हणून स्टेट कॉंग्रेसचा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यात आला. घटनेचा मसुदाही त्यात समाविष्ट होता. सत्याग्रहाची तयारी चालू असतानाच गांधीजींनी आपल्या ‘ हरिजन ’ या साप्ताहिकात “The state and the responsibility” या मथळ्याखाली दि. १७ सप्टेंबर १९३८ ला एक लेख प्रसिद्ध केला. जबाबदार राज्यपद्धतीचा त्यांनी निःसंदिग्ध पुरस्कार केला होता. वातावरणातील धंग एक सारखी वाढत होती. स्वामीजीच आता सर्व चळवळीचे केंद्रबिंदू बनले होते. सरकारचे हजार डोळे त्यांच्या बारीक-सारीक हालचाली टिपीत होते. स्टेट कॉंग्रेसच्या काळात समितीने नवे कार्यकारी मंडळ जाहीर केले. त्यात अध्यक्ष श्री. गोविंदराव नानल सरचिटणीस रामकिशन धूत, सदस्य रवि नारायण रेड्डी, जनार्दनराव देसाई व श्रीनिवासराव बोरीकर यांचा समावेश होता. या पाच जणांनी २४ ऑक्टोबर १९३८ या दिवशी हैद्राबादच्या सुल्तानबाजार या भर वस्तीत एकदम प्रकट होऊन सरकारच्या बंदीची तमा न बाळगता आम्ही स्टेट कॉंग्रेसचे कार्य सुरू करीत आहो अशी घोषणा केली व कॉंग्रेसचे म्हणणे काय ? यासंबंधी एक निवेदन वाचून दाखविले. सुरू झालेल्या सत्याग्रहाची ही

पहिली तुकडी होती. या तुकडीत मराठवाडा, कर्नाटक व तेलंगण या तिन्ही विभागांचे प्रतिनिधी होते. आंध्र तर्फे सामील झालेले रविनारायण रेड्डी पुढे कम्युनिस्ट पक्षाचे मोठे नेते झाले. ते स्वामीजींनाच येऊन भेटले होते व सत्याग्रह करण्याची त्यांनी इच्छा व्यक्त केली होती. जनार्दनराव देसाई कर्नाटकातील एक प्रथितयश वकील होते. त्यांच्याच नेतृत्वाखाली पुढे पोलीस कार्यवाहीनंतर स्वामीजींच्या विरोधात प्रतिस्पर्धी काँग्रेस कायम करण्यात आली होती. हैद्राबादचे वास्तव्य स्वामीजींनी तिन्ही भाषिक विभागांतून पुरोगामी तरुण मंडळींचा मोठा संग्रह करण्यासाठी वापरले होते. हैद्राबादेत तेव्हा एकही केंद्रीय व्यक्ती अशी नव्हती की, जिचा स्वामीजींएवढा तिन्ही विभागांत परिचय आहे व सहकाऱ्यांशी संपर्क आहे. स्वामीजी पुढे चालून तेलगू, कानडी आणि मराठी बोलणाऱ्या तीनही भागांतील लोकांचे सर्वमान्य नेते झाले. त्याचा प्रारंभ त्यांच्या या संपर्कात व धडपडीत होता.

नानल यांच्या अध्यक्षतेखाली पहिली तुकडी सत्याग्रहात गेली. त्याच वेळी असे ठरले होते की, एकट्या हैद्राबाद शहरात आठवड्यातून दोनदा सत्याग्रह करावा. दीर्घकाळ सत्याग्रह चालू राहील इतकी सत्याग्रहींची भरती झाली होती व भूमिगत यंत्रणाही तयार झालेली होती. सर्वांचेच मत असे पडले की, नानल यांच्यानंतर त्यांनी नियुक्त केलेले स्टेट काँग्रेसचे पहिले सर्वाधिकारी म्हणून स्वामीजींनीच सत्याग्रह करावा, त्यामुळे सत्याग्रहाला वजन प्राप्त होईल आणि नेमस्तांच्या नेतृत्वाला शह देणारे जहाल नेतृत्वही प्रस्थापित होईल. यावेळपर्यंत कामाची अशी वाटणी होती की, सरकारशी पत्रव्यवहार वगैरे काशीनाथराव वैद्य यांनी करावा, त्यांनीच गांधीजींशी संबंध ठेवावा. गंमत अशी की, याच काशीनाथराव वैद्यांनी स्वामीजींना उपाहासाने अशी अट घातली होती की, त्यांनी शंभर सत्याग्रहींची यादी आणून द्यावी. नंतर ते १०१ वे सत्याग्रही म्हणून त्यात भाग घेतील. वैद्यांची कल्पना अशी होती की, सत्याग्रही मिळणार नाहीत व सत्याग्रह होणार नाही. परंतु वैद्यांची अनुमाने खोटी ठरली. स्वामीजींना मराठवाडा विभागाने जोरदार साथ दिली. अपेक्षेपेक्षा जास्त सत्याग्रही

मराठवाड्यातच नोंदले गेले. हैद्राबाद शहरात जेवढे सत्याग्रह झाले त्यात मराठवाड्याचाच भरणा अधिक होता. मराठवाड्यात गोविंददास श्रॉफ, आनंदराव वाघमारे, वैशंपायन, अच्युतराव देशपांडे या पुरोगामी लोकांच्या नेतृत्वाखाली मोठ्या प्रमाणावर सत्याग्रहींची नोंदणी झाली. या सत्याग्रहींचाच असा लकडा होता की, मराठवाड्यात सत्याग्रहाची केंद्रे उघडा. त्याप्रमाणे प्रथम औरंगाबादी व मग राहिलेल्या जिल्ह्यांच्या ठिकाणी सत्याग्रह करण्याची परवानगी देण्यात आली. शेवटी शेवटी तर तालुक्यांतूनही सत्याग्रह होऊ लागले.

स्वामीजींनी गोविंदराव नानल यांच्या पहिल्या तुकडीने सत्याग्रह केल्यानंतर २७ ऑक्टोबर १९३८ ला हैद्राबादी सत्याग्रह केला. त्यांच्या तुकडीत व्यं. बा. जोशी (पुढे कॅप्टन जोशी म्हणून प्रसिद्धी पावले.) लातूरचे वकील राघवेंद्रराव दिवाण, तेलंगणचे राजरेड्डी आणि कर्नाटकचे अप्पाराव या चार जणांचा समावेश होता. स्वामीजींच्या आधी नानलांनी सत्याग्रह केला तर त्यांना महिनाभराची साधी शिक्षा देण्यात आली. मात्र स्वामीजींना दीड वर्षाची सक्तमजुरी फर्माविण्यात आली. यात सरकारचे दहशतीचे धोरण होते. सरकारने बिनचूक ओळखले होते की, भावी बंडाचा एकच नेता आहे आणि तो आहे स्वामी रामानंद तीर्थ हा. हे नेतृत्वच खलास केले पाहिजे. त्यांच्यावर अनेक कायद्यांची कलमे लावून त्यांची मानखंडना करून लोकांवर जरब बसविण्यात आली तर सत्याग्रही घाबरतील असा सरकारचा कयास होता. नवल असे की, स्वामीजी संन्यासी असल्याने इतरांप्रमाणे त्यांचे उपजीविकेचे काही साधन नव्हते. अशा माणसाला कफल्लक व उपटसुंभ समजून त्यांच्यावर चॅप्टर केस दाखल करण्यात आली. दीड वर्षाची सक्तमजुरी, शिवाय तुरुंगात वर्ग वगैरे काही नाही. जे थोडे फार नेमस्त तुरुंगात गेले त्यांना मात्र इतरांपेक्षा वेगळी वागणूक देण्यात आली. स्वामीजींचा उलट छळच करण्यात आला. त्यांना सर्व सत्याग्रहींच्या बरोबर तर ठेवले नाहीच उलट एका छोटया, अंधाऱ्या व निमुळत्या खोलीमध्ये त्यांना १११ दिवस एकांतवासात ठेवले गेले. नंतर स्वामीजींना तुरुंगाच्या बऱ्याच वाऱ्या कराव्या लागल्या.

सत्याग्रह असा भरात असतानाच आंदोलनाला बाधक ठरणाऱ्या काही अशुभ घटना घडल्या. स्टेट काँग्रेस सत्याग्रह आंदोलन सुरू करणार हे जवळ जवळ नक्कीच झाले होते. राज्यात हिंदुत्ववादी दृष्टिकोणातून विचार करणारे काही लोक होते. वस्तुत: त्यांच्या मागे ना काही संघटना होती ना त्यांची काही शक्ती होती. त्यांच्यातही नेमस्तांचाच भरणा अधिक होता. काँग्रेसकडे संस्थानाचे नेतृत्व गेले तर हिंदुत्ववादी विचार परत या राज्यात रुजणारच नाही असा त्यांचा दृढ समज होता. म्हणून स्टेट काँग्रेसची हंगामी समिती कायम होण्याच्या आधीच हैद्राबाद शहरात काही हिंदुत्ववादी मंडळींनी एकत्र येऊन हिंदू नागरिक हक्क मंडळ कायम केले होते. याआधीही असे प्रयत्न झाले होते व संस्थानात हिंदूवर कसा अन्याय होतो, नोकऱ्यांत हिंदूंची किती उपेक्षा होते वगैरे माहिती देणाऱ्या पुस्तिका त्यांनी प्रसिद्ध केल्या होत्या. सरकारकडे निवेदनेही दिली होती. या हिंदू हक्कभंग संरक्षण मंडळाने स्टेट काँग्रेसचा सत्याग्रह २४ ऑक्टोबर १९३८ ला सुरू होण्याच्या फक्त तीन दिवस आधी म्हणजे २१ ऑक्टोबरलाच गौळीगुडा राम-मंदिराजवळ सत्याग्रह केला. नंतर मात्र त्यांना संस्थानातून फारसा पाठिंबा मिळाला नाही. संस्थानाबाहेर मात्र हिंदू सभेने पुढाकार घेऊन भागा-नगर नि:शस्त्र प्रतिकार या नावावर आंदोलन सुरू केले व बाहेरचे बरेच सत्याग्रही संस्थानात येऊन तुरुंगात गेले. यात खुद्द संस्थानातील सत्याग्रही नाममात्र होते हे मुद्दाम नमूद केले पाहिजे.

आर्य समाजानेही आपले वेगळेच आंदोलन स्टेट काँग्रेसच्या पाठोपाठ म्हणजे २७ ऑक्टोबर १९३८ ला सुरू केले. हा सत्याग्रह आर्यन डिफेन्स लीगतर्फे होता. आर्य समाजाची सत्याग्रहामागची भूमिका धार्मिक स्वातंत्र्यापुरतीच मर्यादित होती. ही गोष्ट खरी होती की, आर्यसमाजाच्या वतीने जे धार्मिक विधी, यज्ञ, होम, हवन, सत्संग, वेदोपनिषदावरची प्रवचने वगैरे होत त्यांवर निजामाने बंदी टाकली होती. हिंदु-मुस्लिमांचे जे दंगे झाले त्यांत हिंदूंच्या वतीने आर्यसमाजीच प्रतिकारासाठी पुढे असत. धूळपेठ, उदगीर, बीदर, नांदेड, वगैरे ठिकाणी जे दंगे झाले त्यांत आर्य समाजाचे बरेच कार्यकर्ते मारले गेले. आर्य

समाजाच्या सत्याग्रहाला हिंदू हक्क संरक्षण मंडळाच्या तुलनेत स्थानिक पाठिंबा बरा होता. परंतु त्यांचाही भर सर्व भारतातून मोठ्या प्रमाणावर सत्याग्रहींचे जथे पाठविण्यावरच होता. सर्वांत शेवटचा व मोठा जथा हैद्राबादचे पंडित विनायकराव विद्यालंकार यांच्या नेतृत्वाखाली सोलापूरहून निघण्याचे ठरले होते. परंतु दरम्यान निजाम सरकारने आर्य समाजाच्या धार्मिक मागण्या मान्य केल्या, त्यामुळे त्यांचा सत्याग्रह बंद झाला.

हिंदुसभा व आर्यसमाज यांचे सत्याग्रह सुरू झाल्यामुळे जे गांधीजी हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या सत्याग्रह आंदोलनाचे मार्गदर्शन करीत होते त्यांनीच काँग्रेसचा सत्याग्रह स्थगित केला. काँग्रेसचा सर्वसमावेशक राष्ट्रीय विचार, तिची धर्मनिरपेक्ष भूमिका आणि नागरी स्वातंत्र्यासह जबाबदार राज्यपद्धतीसारखी राजकीय मागणी यांची इतर संघटनांच्या भूमिकांशी व सर्वस्वी भिन्न अशा वैचारिक स्वरूपाशी गल्लत होऊ नये म्हणून गांधीजींनी हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या नेत्यांना वर्ध्याला बोलावून घेतले व सत्याग्रह स्थगित करण्यास सांगितले. डिसेंबर १९३८ च्या २४ तारखेला काशीनाथराव वैद्य यांच्या नेतृत्वाखाली हैद्राबादी अठराव्या तुकडीने सत्याग्रह केला व याच दिवशी सत्याग्रह स्थगित करण्यात येत असल्याची त्यांनी घोषणा केली. तेच या सत्याग्रह आंदोलनातील शेवटच्या म्हणजे १८ व्या तुकडीचे सर्वाधिकारी होते. गांधीजींच्या सल्ल्यावरूनच त्यांनी सत्याग्रह स्थगित केल्याची घोषणा केली.

वैद्यांनी त्यांच्या नेमस्त धोरणास अनुसरून अशी भूमिका घेतली की, त्यांनी सत्याग्रह केला खरा परंतु कुठल्याच कायद्याचा भंग केला नाही. उलट सत्याग्रहामुळे जो कायदेभंग होत होता तो त्यांनी थांबविला. गांधीजींनी सत्याग्रह सुरू करतानाच सत्याग्रहींनी कोणत्या अटी पाळावयाच्या याची एक संहिताच तयार करून दिली होती. दुसऱ्या तुकडीचे पहिले सर्वाधिकारी म्हणून स्वामीजींनी जेव्हा सत्याग्रह केला त्याचवेळी त्यांनी ही आचारसंहिता सर्व सत्याग्रहींसाठी घोषित केली होती. त्यातली प्रमुख अट अशी होती की, सत्याग्रही आपण कायदा मोडला याची कबुली देईल. कोर्टात आपला बचाव करणार नाही व

न्यायालय देईल ती शिक्षा भोगील. काशीनाथराव वैद्यांनी या अटीचा भंग केला होता. स्टेट काँग्रेसच्या व हैद्राबाद संस्थानाच्या पुढच्या राजकारणात स्वामीजींसारख्या जहालांना याच कायदेबाज प्रवृत्तीशी प्रखर लढा द्यावा लागला.

सत्याग्रह स्थगित झाल्यामुळे स्टेट काँग्रेसच्या गोटात निराशा पसरली. गांधीजींचा दृष्टिकोण पूर्णांशाने लोकांपर्यंत आलाच नव्हता. जे तुरुंगात होते त्यांना तर काहीच कळत नसे. अनेकांनी सत्याग्रही म्हणून नावे नोंदविली होती. सत्याग्रह चालू राहिला असता तर आणखी हजार दीड हजार लोक सहजच तुरुंगात गेले असते. तेही खूप निराश झाले. गांधीजींवर टीका होऊ लागली. स्वामीजी तेव्हा तुरुंगात होते. त्यांचा गांधीजींच्या विचारांवर पूर्ण विश्वास होता. त्यांनी सत्याग्रहींना समजावले व तुरुंगातील काळ स्टेट काँग्रेसला कार्यकर्त्यांची चांगली प्रशिक्षित पलटण मिळेल या दृष्टीने उपयोगात आणला. परंतु मनोमनी तेही सत्याग्रह स्थगितीच्या निर्णयाने फार व्यथित झाले होते. गांधीजींनी सत्याग्रह स्थगित करण्याचा सल्ला दिला आणि लगेच त्यांनी हैद्राबादचे तेव्हाचे पंतप्रधान सर अकबर हैदरी यांच्याशी पत्रव्यवहार सुरू केला. स्टेट काँग्रेसने सत्याग्रह स्थगित करून इतर जातीय संस्थांपासून आपले वेगळेपण सिद्ध केले आहे. तिचा सहकार्याचा हात शासनाने स्वीकारावा. बंदी उठवावी व तिला कार्य करण्याची संधी द्यावी. त्या दिशेचा पहिला देकार म्हणून शासनाने आतापर्यंत पकडलेले सर्व सत्याग्रही सोडून द्यावेत. हैदरींनी बाकीच्या गोष्टी तर काही मान्य केल्या नाहीत, परंतु हळूहळू सत्याग्रहींची सुटका केली. स्वामीजींची सुटका सर्वांत शेवटी म्हणजे १० एप्रिल १९३९ ला करण्यात आली.

❦ ❦

# ७

# गांधीजींचा सहवास, वैयक्तिक सत्याग्रह

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसच्या नेतृत्वाखाली सुरू झालेले सत्याग्रह आंदोलन गांधीजींच्या आदेशावरून तहकूब करण्यात आले. नंतर हळूहळू करून सत्याग्रही सुटले. पुढचा काळ फार कठीण व जिकिरीचा गेला. सत्याग्रही सुटल्यानंतर काय, असा प्रश्न होता. मवाळ गप्प बसलेले नव्हते. तसेच सरकारही स्तब्ध नव्हते. सरकारचा या काळातच नव्हे तर आधीपासून दुहेरी डाव होता. एकीकडे संस्थानातील मुस्लिम जनतेत जातीय भावना भडकवावयाची, ती राजकीय दृष्टचा संघटित करावयाची. तर दुसरीकडे स्टेट कॉंग्रेसमध्येच जहाल–मवाळ अशी फूट पाडून त्यातल्या त्यात राजनिष्ठ असणारे मवाळ आपल्या हाती ठेवून ते स्टेट कॉंग्रेसच्या विरुद्ध वापरावयाचे.

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसची स्थापना व तिच्या सत्याग्रहाची सुरुवात झाली त्याच काळात संस्थानातील इत्तेहादुल मुस्लिमीन या राजकीय परंतु, जमातवादी संघटनेत नवा जीव ओतण्यात आला. स्वामीजींचे नेतृत्व सरकारची इच्छा असो–नसो, संस्थानी जनतेच्या मनात दिवसें-दिवस रुजत चालले होते. सत्याग्रहाच्या काळात खेड्यापाड्यांपर्यंत कॉंग्रेसच्या बरोबरीने स्वामी रामानंद तीर्थ हे नाव जाऊन पोचले होते. या नेतृत्वाला काटशह देण्याची कुवत मवाळांत नव्हती. निजामी कार्य-पद्धतीप्रमाणे शक्यता एकच होती की, स्टेट कॉंग्रेसच्या समोरासमोर संघटित मुस्लिम जातीयतेची जबरदस्त फळी आणून उभी करावी. मुस्लिम जनता निजाम, आसफिया घराणे व निजामाचे सरकार यांच्या

पाठीशी उभी होतीच. आतापर्यंत इत्तेहादुल मुस्लिमीन ( मुसलमानांचे ऐक्य ) ही केवळ एक धार्मिक व सामाजिक स्वरूपाची मृतप्राय संघटना होती. बहुतेक राजनिष्ठ असणारे व सधन असणारे नबाब व जाहगीर-दारच तिच्या अधिकारपदावर होते. प्रथमतःच इत्तेहादला नबाब बहादुर यार जंग यांच्यासारखा आकर्षक व्यक्तिमत्त्वाचा, जिद्दीचा, वादळी वक्तृत्व असलेला व स्वतः नबाब (जाहगीरदार) असलेला नेता मिळाला. इत्तेहादचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली. प्रांतिक परिषदा व पुढे स्टेट कॉंग्रेस जसजशा संघटित होऊ लागल्या तसतसे बहादुर यार जंग यांचे संस्थानभर दौरे सुरू झाले. बहादुर यार जंग यांचे उर्दू भाषेवर विलक्षण प्रभुत्व होते. ते फार धार्मिक प्रवृत्तीचेही होते. हिंदूंच्या सभा लहान असोत की मोठ्या, धार्मिक असोत की सामाजिक त्यांना सरकारी परवानगी अत्यावश्यक असावयाची व ती बहुधा मिळावयाची नाही. मुस्लिमांच्या सर्व प्रकारच्या सभा ठिकठिकाणच्या मशिदींतून चालावयाच्या व धार्मिक म्हणून त्यांना सर्रास मुभा असा-वयाची. आरंभी आपण बघितलेच आहे की, १९३८ व ३९ या दोन वर्षांच्या काळात संस्थानात फार मोठ्या प्रमाणावर हिंदु-मुस्लिमांचे दंगे झाले. बहादुर यार जंग यांचे व्याख्यान झाले रे झाले की, त्या ठिकाणचे वातावरण तापलेच. प्रत्येक मुसलमानाने आपण या राज्याचे मालक व हक्कदार आहोत असे समजूनच वागले पाहिजे. राज्य करण्यासाठीच आपली जमात निर्माण झाली आहे. अशा प्रकारची प्रक्षोभक व भडक भाषणे ऐकून मुस्लिम मगरूर बनत. त्यांची प्रतिक्रिया मग तेवढीच तीव्र असावयाची. हिंदू प्रजाही असल्या अतिरेकी प्रचाराने प्रतिकारक्षम होऊ लागली. बहादुर यार जंग आणि एम्. नरसिंगराव यांच्या दरम्यान झालेल्या पत्रव्यवहाराचा उल्लेख आरंभी केलाच आहे. बहादुर यार जंगांना म्हणजेच संस्थानातील मुस्लिमांना जबाबदार राज्यपद्धती मान्य नाही असे निमित्त सरकारला आयतेच मिळाले व स्टेट कॉंग्रेसवर बंदी टाकण्यात आली.

सत्याग्रह स्थगित झाल्यानंतर गांधीजी व अकबर हैदरी यांच्या

दरम्यान बराच पत्रव्यवहार झाला. संस्थानात जे नेमस्त पुढारी सत्याग्रहात न जाता बाहेर होते व जे नंतर सुटले होते त्यांनी परत सरकारशी वाटाघाटी सुरू केल्या. मध्यंतरी सरकारकडूनच अशी सूचना जी. रामाचारी यांच्यामार्फत आली की, स्टेट कॉंग्रेस या नावाचा हट्ट सोडला व बाहेरच्या राजकीय संघटनांशी कसलाही संबंध ठेवला नाही तर सरकार राजकीय संघटनेला परवानगी देईल. हे पुढारी गांधीजींना जाऊन भेटले. नावासाठी हट्ट धरू नये असेच गांधीजींचे मत पडले. हैद्राबाद नॅशनल कॉन्फरन्स ( काश्मीरच्या धर्तीवर ) अथवा हैद्राबाद प्रजा परिषद असे पर्याय समोर आले. स्टेट कॉंग्रेसमध्ये स्वामीजींसह युवकांचा एक मोठा गट एव्हाना संघटित झाला होता. त्याने नाव बदलण्यास सक्त विरोध केला. त्यांचे म्हणणे असे होते की, सरकार केवळ चाळवण्या देत आहे. सरकारला मुळी संस्थानात राजकीय संघटनाच नको आहे. पुढे या गटाचेच म्हणणे खरे ठरले. परंतु गांधीजींचा होकार घेऊन मवाळ पुन्हा वाटाघाटीच्या गुऱ्हाळात अडकले.

सत्याग्रही सुटून आले होते. त्या सर्वांना पुढची दिशा दाखवणे व कामाला लावणे आवश्यक होते. या सत्याग्रहींत युवकांचा व विद्यार्थ्यांचाच भरणा अधिक होता. सत्याग्रह चालू असतानाच संस्थानात वंदे मातरम् या राष्ट्रगीताचे एक प्रकरण उद्‌भवले. उस्मानिया विद्यापीठात मुस्लिम विद्यार्थ्यांसाठी खास मशिदी होत्या. तेथे ते नमाज पढत असत. हिंदू विद्यार्थ्यांनी आपल्या प्रार्थना हॉलमध्ये वंदेमातरम् म्हणावयास सुरुवात केली. या प्रकरणाचा प्रारंभ प्रथम औरंगाबादच्या इंटर मीजिएट कॉलेजात झाला व नंतर ते संस्थानभर पसरले. वंदे मातरम्‌वर विद्यापीठाने व नंतर सरकारने बंदी घातली. मुलेही पेटली. त्यांनी संघटित होऊन प्रतिकार केला व जेथे राष्ट्रगीत म्हणू दिले जात नाही तिथे आम्ही शिकणार नाही असा निर्धार करून मुलांनी उस्मानिया विद्यापीठ व संस्थानभरातील शाळा-कॉलेजे ओस पाडली. या मुलांना नागपूर विद्यापीठाने प्रवेश दिला. संपूर्ण विद्यापीठ ओस पाडून विद्यार्थ्यांची मोठी संख्या दुसऱ्या विद्यापीठात जाण्याचा हा प्रकार अनुपम होता. स्वामीजी तेव्हा तुरुंगात होते. परंतु सरकारचा असा पक्का वहीम होता

की, तेच या वंदेमातरम् आंदोलनाचे सूत्रधार आहेत. त्या वेळी मराठवाड्यात गोविंददास श्रॉफ, आनंद कृष्ण वाघमारे, अण्णासाहेब वाळूजकर, अच्युतराव देशपांडे, स. कृ. वैशंपायन वगैरे तरुण मंडळी मोकळीच होती. त्यांनी वंदेमातरम् आंदोलन संघटित करण्यात फार मोठा भाग घेतला.

सत्याग्रही सुटल्यावर मनमाडला त्यांची एक बैठक बोलावण्यात आली. गोविंदराव नानल, स्वामीजी, धूत, वैद्य, गोविंददास श्रॉफ, आ. कृ. वाघमारे, माणिकचंद पहाडे, श्रीनिवासराव बोरीकर, जनार्दनराव देसाई, नारायण रेड्डी वगैरे प्रमुख मंडळी मनमाडच्या बैठकीस हजर राहिली. पुढे काय या प्रश्नावर खूप भवति न भवति झाली. जहाल मंडळींचा आग्रह परत आंदोलन सुरू करावे असा होता, तर मवाळांचा त्याला विरोध होता. येथून पुढेच स्वामीजी गट व मवाळ गट असे दोन तट स्पष्ट होत गेले. अगदी पोलिस कारवाईपर्यंत हे मतभेद कायम राहिले. मनमाड बैठकीनंतर स्टेट काँग्रेसची कार्यकारिणी व प्रातिनिधिक स्वरूपाचे एक शिष्टमंडळ वर्ध्याला गांधीजींना भेटायला गेले. गांधीजींनी दोन-तीन गोष्टी सांगितल्या. नाव बदलून परवानगी मिळविण्याचा प्रयत्न वैद्य वगैरेंनी करून बघावा. पत्रव्यवहार काँग्रेसतर्फेच व्हावा. स्वामीजींनी व त्यांच्या गटाने विधायक कार्य करून संस्थानी जनतेत जागृती वाढवावी. संघटना बांधावी.

स्वामीजींनी आपल्या आठवणींच्या संग्रहात असे म्हटले आहे की, या काळी सरकार व स्टेट काँग्रेस यांच्या दरम्यान जो पत्रव्यवहार झाला तो काशीनाथराव वैद्य यांच्या नावाने झाला असला तरी त्यातील प्रत्येक पत्र स्वतः गांधीजींनीच लिहिले होते. स्वामीजी तेव्हा स्टेट काँग्रेसचे सरचिटणीस बनले होते. हा सर्व खटाटोप शेवटी व्यर्थ ठरला. सर अकबर हैदरी हे स्वतःला फार पुरोगामी व राष्ट्रवादी म्हणवीत असत. उत्तम प्रशासक म्हणून गांधीजींचा त्यांच्यावर विश्वास होता. परंतु शेवटी तेही काही करू शकले नाहीत. नाव बदलण्याची स्टेट काँग्रेसने तयारी केली. संस्थानभर दहा हजारांवर सभासद झाले. राष्ट्रीय परिषद या नावाने कामही सुरू झाले. परंतु सरकारने शेवटी तिलाही परवानगी नाकारली.

या काळात स्वामीजींनी हैद्राबादी कार्यकर्त्यांची एक बैठक बोलावून विधायक कामासाठी विधायक कार्य समिती नियुक्त केली. या समितीमध्ये स्वामीजीना मानणारेच आधिक्याने होते. पूर्णवेळ कार्यकर्त्यांची पद्धती या समितीपासून सुरू झाली. तालुक्यापर्यंत व काही ठिकाणी त्याच्याही खाली खेड्यापर्यंत कार्यकर्त्यांचे गट तयार झाले. खादीभांडारे बहुधा त्याच काळात उघडली. कार्यकर्ते खांद्यावर खादी घेऊन खेडोपाडी जाऊ लागले. अस्पृश्योद्धार, साक्षरता प्रसार, राष्ट्रीय उत्सव असे कार्यक्रम सुरू झाले. संस्थानभर कृतिशील कार्यकर्त्यांची एक साखळीच तयार झाली.

दुसरे महायुद्ध सुरू झाले होते. सरकारने या संधीचा फायदा घेऊन मराठवाड्यात संघटना बांधण्यात व आंदोलन उभारण्यात जे आघाडीवर होते त्यांच्या मस्तकावर जबर प्रहार करावा या हेतूने गोविंददास श्रॉफ, स. कृ. वैशंपायन, आ. कृ. वाघमारे, डी. एल. पाठक, रतिलाल जरीवाला व सय्यद हबीबुद्दीन यांना अटक करून स्थानबद्ध केले. हा गट मराठवाड्यात फार कार्यप्रवण होता व उत्तम संघटना बांधणी त्याने सुरू केली होती. स्वामीजींना या कृतीने बराच मोठा धक्का बसला. ते अस्वस्थ झाले. त्यातून दुसरे युद्ध सुरू झाल्यामुळे बाहेर काँग्रेस नेतेही व्यग्र होते. अशा अस्वस्थ अवस्थेत एके दिवशी स्वामीजी सेवाग्रामला गेले. नेहमीप्रमाणे ते गांधीजींना भेटले. स्वामीजींची अस्वस्थता गांधीजींच्या नजरेतून सुटली नाही. त्यांनी स्वामीजींना सेवाग्राममध्ये आठ-दहा दिवस थांबवून घेतले. दररोज सकाळी गांधीजींच्या बरोबर स्वामीजी फिरायला जात. हैद्राबादच्या प्रश्नावर बोलणे निघे. गांधीजी कसला तरी गंभीर विचार करीत होते. परिस्थिती अडचणीची होती व अडचणीतूनच गांधीजींना मार्ग काढावयाचा होता. स्वामीजींच्या मनातही विलक्षण काहूर माजले होते. गेल्या काही वर्षांपासून मराठवाड्यातील ज्या तरुणांच्या गटाने स्वामीजींची साथ केली होती व महाराष्ट्र परिषद आणि स्टेट काँग्रेसची शिस्तशीर संघटना उभी केली होती, त्यांच्यापैकी काही प्रमुखांना शासनाने एकाएकीच स्थानबद्ध केले. या मंडळींनी औरंगाबादी एक मोठी कामगार परिषदही

संघटित केली होती. सरकारचा त्यांच्याविषयी असा ठाम वहीम होता की, ते कम्युनिस्ट आहेत. कम्युनिस्टांचा प्रथम युद्धाला विरोध होता याचे निमित्त करून या मंडळींना सन १९४० मध्ये अटक करून सुमारे दोन अडीच वर्षांनंतर त्यांना सोडण्यात आले. स्वामीजींच्या मनात हे शल्य मनस्वी बोचत होते. आपण सुटलो आणि आपले जिवाभावाचे सहकारी अनिश्चित काळासाठी तुरुंगात डांबण्यात आले आहेत. आपले कर्तव्य काय ? यावर विचार करीत असतानाच स्वामीजींनी गांधीजींकडे आपल्या सहकाऱ्यांच्या सुटकेसाठी आमरण उपोषण करण्याची परवानगी मागितली. गांधीजींनी अर्थातच नकार दिला. आत्मक्लेशाचा मार्ग असा वापरावयाचा नसतो. हे अहिंसात्मक परिवर्तनात बसणारे नाही. म्हणून त्यांना स्वामीजींचे उपोषण मान्य झाले नाही. परंतु काही दिवस सेवाग्रामलाच थांबवून घेऊन त्यांनी स्वामीजींना एके दिवशी सरळच प्रश्न टाकला. ‘तुमचा अहिंसेवर कितपत विश्वास आहे ? अहिंसा ही तुमची निष्ठा का केवळ धोरण ? तुम्ही आपल्या जीवनमूल्यासाठी किती त्याग करू शकता ? तुमचे मुंडके छाटले जाईल. लोकांवर अनन्वित अत्याचार होतील. सहकारी मारले जातील. नको ते छळ सहन करावे लागतील. सत्याग्रही निष्ठेने तुम्ही ते करू शकाल काय ? अशा प्रश्नी संख्या महत्त्वाची नसते. मोजकी माणसे मिळाली तरी मी पुढचे पाऊल उचलण्यास तयार आहे. आत्ताच उत्तर मला नको आहे. पुरेसा अवधी घ्या व मला नक्की काय ते सांगा.’ स्वामीजींची ही परीक्षा होती. अहिंसेचा त्यांनी या दृष्टीने कधी विचारच केला नव्हता. संपूर्ण रात्र विलक्षण अस्वस्थतेत गेली. एक प्रचंड उलथापालथ स्वामीजींच्या अंतर्यामी झाली. संन्यास घेताना फारसे काही वाटले नाही परंतु या वेळी मनाची अवस्था फार दोलायमान झाली. स्वामीजी लिहितात की, पहाटे पहाटे डोळा लागला. सकाळी उठलो आणि गांधीजींकडे गेलो. त्यांना सांगून टाकले की, अहिंसेचा स्वीकार मी जीवननिष्ठा म्हणून केला. तुमच्या मार्गाने जाण्याची माझी तयारी आहे. तुम्ही सांगाल ते करीन. मनावरचे मोठे ओझे हलके झाले. नकळत स्वामीजींनी गांधीजींच्या चरणाला स्पर्श केला. गांधीजी सहजी

भावनावश होणाऱ्यांपैकी नव्हते. त्यांचेही डोळे पाणावले. त्यांनी स्वामीजींना वर उचलले. पाठीवर थाप मारली, न बोलता गांधीजींनी जणू स्वामीजींना सांगून टाकले होते की, हैद्राबादच्या जनतेला आता खरा नेता लाभला आहे आता लढाई आपण जिंकलीच आहे. गांधीजींनी नंतर सत्याग्रहासंबंधी स्वामीजींना काही सूचना केल्या व स्वामीजींनी परत हैद्राबादी जावे असे ठरले. त्या आधी त्यांनी निजामाला एक पत्र लिहून जबाबदार राज्यपद्धती देणे व स्टेट काँग्रेसवरची बंदी उठविणे त्यांच्याच हितासाठी कसे आवश्यक आहे हे सांगण्याचा प्रयत्न केला. स्वामीजी हैद्राबादी आले आणि ११ सप्टेंबर १९४० ला त्यांना व्यक्तिगत सत्याग्रही म्हणून अटक झाली. याआधीच स्वामीजींकडे अनेकांनी सत्याग्रहासाठी नावे नोंदविली होती. त्यापैकी प्रत्येकाला त्यांनी असे सांगितले की, गांधीजींची व्यक्तिगत परवानगी घेतल्याखेरीज कोणालाच वैयक्तिक सत्याग्रही होता येणार नाही. स्वामीजींच्या पाठोपाठ गांधीजींनी आता आचार्य विनोबाजींच्या आश्रमात असणारे अच्युतराव देशपांडे, ( रांजणीकर ), बीडचे हिरालाल कोटेचा, मोतीलाल मंत्री आणि देवराम चव्हाण या चौघांना परवानगी दिली. कर्नाटकचे जे. के. प्राणेशाचार्य यांनाही वैयक्तिक सत्याग्रही म्हणून अटक झाली.

स्वामीजींची रवानगी अत्यंत गुप्तपणे एका बंद मोटारीतून निजामाबादच्या तुरुंगात करण्यात आली. सुमारे १५ महिन्यांनंतर म्हणजे १६ डिसेंबर १९४१ ला स्वामीजींसह वैयक्तिक सत्याग्रहींची सुटका करण्यात आली. बाहेरही याच वेळी गांधीजींनी वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला होता. जागतिक युद्धाची गुंतागुंत वाढतच होती. संस्थानातील युवकांना व जहाल मंडळींना वैयक्तिक सत्याग्रहाचा मार्ग प्रभावी वाटला नव्हता. त्यांना काही तरी जहाल व प्रखर कार्यक्रम हवा होता. स्वामीजींनी तुरुंगातून सुटल्यानंतर गांधीजींना कळविले. त्यांचे पत्र आल्यावर ते सेवाग्रामला त्यांना भेटण्यासाठी गेले. दोघांचे बरेच बोलणे झाले. स्वामीजी जहालांचे नेते होते व ते विचाराने आता पूर्णपणे गांधीजींचे अनुयायी बनले होते. हा काळ कठीण होता. गप्प बसणेही शक्य नव्हते. संस्थानातील लोकांना हे कळून चुकले

होते की, स्टेट काँग्रेसवरील बंदी निजाम उठवीत नाही. अशा स्थितीत जुन्या प्रांतिक परिषदांचे पुनरुज्जीवन करून अनेकांनी त्यांच्यामार्फत राजकीय कार्य सुरू केले होते. स्वामीजींसमोर प्रश्न होता की, त्यांनी काय करावे? गांधीजींनी त्यांना सल्ला दिला की, त्यांनी प्रांतिक परिषदांचे सभासद होऊ नये व त्यांत गुंतून पडू नये. बंदी असली तरी त्यांनी स्टेट काँग्रेसचेच प्रतिनिधित्व केले पाहिजे. त्याप्रमाणे स्वामीजी महाराष्ट्र, आंध्र व कर्नाटक परिषदेच्या अधिवेशनाला गेले. त्यांची कामेही ते नित्यनेमाने करू लागले. परंतु त्यांनी एकाकीपणे स्टेट काँग्रेसची ध्वजा आपल्या खांद्यावर घेतली ती अखेरपर्यंत.

या वेळेपर्यंत सर्व संस्थानांतील जनतेच्या स्वातंत्र्य आंदोलनांना केवळ नाममात्र एकत्र सांधणारी स्टेट पीपल्स कॉन्फरन्स नावाची संघटना होती. तिची एक व्यापक स्थायी समिती होती. ४२ च्या सुमारास म्हणजे भारत छोडो आंदोलन सुरू होण्याच्या आधी गांधीजींनी या संस्थानी जनता परिषदेच्या कार्यकारिणीची बैठक सेवाग्रामला बोलावली होती. गांधीजी या वेळी एका निर्णायक व अंतिम लढ्याची तयारी करीत होते. इतके दिवस काँग्रेसची भूमिका अशी होती की, संस्थानी जनतेने आपल्या स्वातंत्र्याचे आंदोलन आपल्या बळावर चालवावे. या वेळी, मात्र त्यांची भूमिका बदलली होती. सर्व भारत एक. सर्व जनता एक. संस्थानाच्या कृत्रिम भिंतींनी स्वातंत्र्याचे कप्पे पडता कामा नयेत. म्हणून सर्व संस्थानांतील जनतेने व तिच्या संघटनांनी भारत छोडो आंदोलनात भाग घ्यावा. गांधीजींच्या सांगण्यावरून स्वामीजींनी सेवाग्रामच्या स्थायी समितीसमोर हैद्राबादची बाजू मांडली होती. हैद्राबादेत सरकारने परत मवाळांना हाताशी धरून आंदोलनात फूट पाडली होती. मवाळांनी सरकारशी व इत्तेहादुल मुस्लिमीनशी परत ऐक्याच्या व तडजोडीच्या वाटाघाटी सुरू केल्या होत्या. बाहेर कम्युनिस्टांनी वेगळी भूमिका घेतली होती. परिणामी हैद्राबादेतही त्यांनी कम्युनिस्ट पक्ष म्हणून काम करण्यास सुरुवात केली होती. त्यांना गांधीजीप्रणीत ४२ चे आंदोलन मान्य नव्हते, तर मवाळांनी इत्तेहादशी वाटाघाटी करून एक वेगळी टूम काढली होती. एकात्म भारताच्या मुळावर घाव

घालणारी ही राजकीय खेळी होती. चळवळ उभी राहता कामा नये असा या मागील उद्देश होता. स्वामीजी हे ओळखून होते. त्यांनी महात्माजींकडे वैयक्तिक सत्याग्रहाची परवानगी मागितली. गांधीजी म्हणाले, असेल नसेल त्या शक्तीनिशी संपूर्ण भारताच्या स्वातंत्र्यासाठी 'करा अथवा मरा' या जिद्दीने तुटून पडा. स्वामीजींनी एक पत्र निजामाला व एक त्याच्या पंतप्रधानाला लिहिले व जनतेला सर्व शक्तींसह ४२ च्या भारत छोडो आंदोलनात भाग घेण्यासाठी आवाहन करणारे निवेदन काढले. बाहेर गांधीजींसह बाकीचे सर्व नेते पकडले गेले होते. स्वामीजी सोलापुरी येऊन थांबले. तेथून त्यांनी संस्थानभरातील कार्यकर्त्यांना पत्रे पाठविली व नंतर स्वतः हैद्राबादेत प्रवेश केला. १६ ऑगस्ट १९४२ ला स्वामीजी हैद्राबाद शहरामधील नामपल्ली स्टेशनवर उतरले आणि तेथेच त्यांना अटक करण्यात आली. त्याआधी ९ ऑगस्टपासूनच संस्थानभर धरपकड सुरू झाली होती. स्वामीजींच्या अटकेची बातमी वणव्यासारखी पेटली. हैद्राबाद व सिकंदराबादेत अटकेच्या निषेधार्थ कडकडीत हरताळ पाळण्यात आला. संस्थानातील इतर ठिकाणीही लोकांच्या संतप्त प्रतिक्रिया उमटल्या. बाहेर कोणी नव्हते. तरी जे काही कार्यकर्ते होते त्यांनी सत्याग्रहाची केंद्रे उघडून सत्याग्रही तुरुंगात पाठवले. चार महिन्यांच्या अवधीत पाचसातशे लोक तुरुंगात गेले. काही ठिकाणी व विशेषतः मराठवाड्यात निवडक ठिकाणी मोडतोडीच्या घटनाही घडल्या. अंबाजोगाईच्या युवकांच्या एका गटाने रेल्वे रूळ उखडणे, पोस्टाच्या पेट्या व सरकारी रेडिओ जाळणे इत्यादी गोष्टी केल्या. निवडक तरुणांनी का असेना परंतु स्वामीजींचा आदेश निष्ठेने पाळला व निजामाने मोठ्या धूर्तपणे केलेले आजाद हैद्राबादचे कारस्थान तूर्त तरी उधळून लावले. बेचाळीसमध्ये पकडलेल्या सत्याग्रहींची सुटका निजाम सरकारने हप्त्या हप्त्याने करण्यास प्रारंभ केला. बहुतेकांना आठ-नऊ महिन्यांनंतर सोडले. स्वामीजी व त्यांच्या बरोबरच्या चौघा-पाचजणांना मात्र तब्बल सोळा महिन्यांनंतर १६ डिसेंबर १९४३ ला सोडले. या प्रदीर्घ काळात स्वामीजी हैद्राबादच्या चंचलगुडा जेलमध्येच होते.

स्वामीजींनी एकीकडे प्रांतिक परिषदांचे पुनरुज्जीवन करण्यास मुभा दिली व ते स्वत: मात्र बंदी घातलेल्या स्टेट कॉंग्रेसचे एकमेव प्रतिनिधी म्हणून राहिले. या गोष्टीचा मवाळांनी बराच गैरफायदा घेतला. तेलंगणात जी आंध्र परिषद होती तिचा कम्युनिस्टांनी जवळ-जवळ ताबा घेतला होता. मवाळ व इतर राष्ट्रवादी कम्युनिस्टांच्या तुलनेत निष्क्रिय होते. याचाही ठपका स्वामीजींवर ठेवण्यात आला व ते कम्युनिस्टधार्जिणे आहेत असा गिल्ला त्यांच्याविरुद्ध करण्यात आला. परंतु याच वेळेपासून तेलंगण आणि कर्नाटक भागात स्वामीजींच्या नेतृत्वाखाली बिगरकम्युनिस्ट राष्ट्रवादी परंतु जहाल शक्ती संघटित होऊ लागल्या होत्या. तेलंगणमध्ये जमलापूर केशवराव यांच्यामार्फत एक मोठा गट स्वामीजींचा अनुयायी झाला. पुढे चालून पी. व्ही. नरसिहराव ( आताचे परराष्ट्र व्यवहारमंत्री ), के. व्ही. नरसिहराव, ही पुरोगामी तरुण मंडळीही स्वामीजींना येऊन मिळाली. तेलंगणातील जमीनदारीच्या विरोधात पुरोगामी भूमिका घेणारा हा स्वामीजींचा गट होता. अशीच स्थिती कर्नाटकात झाली. तेथेही जगन्नाथराव चंद्रकी, वि. पां. देऊळगावकर, मुरलीधरराव कामतीकर, वगैरे तरुण स्वामीजींच्या नेतृत्वाखाली ठाम भूमिका घेऊन संघटित झाले. मराठवाड्यात तर आता मवाळांना अनुयायीच उरला नव्हता. गोविंदभाई, वाघमारे व बाबासाहेब यांनी मराठवाड्याला उत्तम नेतृत्व दिले होते व स्वामीजींच्या राजकारणाची मुळे खोलवर रुजविली होती. तिन्ही विभागातील हेच गट त्या त्या प्रांतिक परिषदांत अग्रेसर व सक्रिय होते. छोटी-मोठी आंदोलने त्यांनी सुरू केली होती. सामाजिक असणाऱ्या या परिषदा आता उघड उघड राजकीय बनल्या होत्या व जबाबदार राज्यपद्धतीची व नागरी हक्कांची मागणी करू लागल्या होत्या. या तिन्ही परिषदांनी भक्कमपणे स्वामीजींचे नेतृत्व स्वीकारले होते. मवाळांना हे सहन झाले नाही. त्यांनी स्वामीजींचा कडवा विरोध सुरू केला. निजामाच्या शासनाने अर्थातच मवाळांची साथ केली. याच संगनमतातून आजाद हैद्राबादची घातकी कल्पना निघाली होती.

बेचाळीसच्या आंदोलनानंतर देशभरच एक विफलतेची व निराशेची लाट आली. हैद्राबाद संस्थानही त्याला अपवाद नव्हते. या काळाचा उपयोग स्वामीजींनी व त्यांच्या अनुयायांनी प्रांतिक परिषदांच्या संघटना भक्कम करण्यासाठी केला. पूर्णवेळी कार्यकर्त्यांची एक शिस्तबद्ध सेना व त्यांच्या राजकीय शिक्षणाची व्यवस्था या बळावर संघटना वाढत गेल्या. या परिषदा म्हणायला प्रांतिक होत्या. परंतु प्रत्यक्षात त्या बंदी असलेल्या हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या प्रादेशिक शाखा म्हणूनच काम करीत होत्या. तिन्हींची प्रादेशिक कार्यालये हैद्राबाद शहरात होती. मवाळ आणि त्यांच्या आडून सरकार यांचा असा प्रयत्न होता की, या परिषदांना एकत्र येऊ द्यावयाचे नाही. त्यांना विभक्त ठेवावयाचे, याउलट स्वामीजी व त्यांचे जहाल अनुयायी यांचा प्रयत्न तिन्ही परिषदांना एकत्र आणण्याचा होता. त्यासाठी बी. रामकृष्णराव यांच्या अध्यक्षतेखाली तिन्ही परिषदांची मिळून जॉईंट कोऑर्डिनेशन कमिटी (जे. सी. सी.) नेमण्यात आली होती. जहाल–मवाळांच्या सततच्या व वाढत्या मतभेदांचेच हे एक व्यासपीठ बनले परंतु अखेरीस काळाने वेगळेच वळण घेतले व स्वामीजींच्या व्यापक दूरदृष्टीचाच अंती विजय झाला.

हैद्राबाद संस्थानातील जनतेचे स्वातंत्र्य आंदोलन, त्यामागच्या शक्ती व एकूण संस्थानी राजकारण लक्षात घेण्यासाठी स्वामीजींच्या नेतृत्वाखाली जहालांनी, मवाळांशी व सरंजामी जातीयवादी शासनाशी जो लढा दिला यातील काही मुद्दे समजावून घेणे आवश्यक आहे.

पहिली गोष्ट अशी की, मवाळांत दोन गट होते. एक गट प्रामाणिकपणे घटनात्मक व कायदेशीर लढा देऊन आस्ते आस्ते स्वराज्याकडे जावे या मताचा होता तर दुसरा सरळ सरळ निजामाला व त्याच्या सत्तेला फितूर होता. हैद्राबादच्या निजामी शासनाने आरंभापासून सर्व संस्थानांतील जनतेसाठी एकच एक राजकीय संघटना निर्माण होऊ नये असा एकीकडे प्रयत्न केला तर दुसरीकडे मुसलमानांच्या संघटनेला केवळ प्रोत्साहनच दिले नाही तर आपल्या आश्रयाखाली वाढविले. बहादुर यार जंग निजामाच्या संमतीने इत्तेहादचे अध्यक्ष झाले. पुढे

त्यांचे मतभेद झाले तेव्हा त्यांचा अंत झाला. बहादुर यार जंग यांचा खून झाला व त्यांची यार जंग ही पदवी काढून घेण्यात आली. निजामाने इत्तेहादुल मुस्लिमीन कटाक्षाने आपल्या हाती राखली. बाहेरील मुस्लिम लीगशी व महंमद अली जीना यांच्या नेतृत्वाशी इत्तेहादचा फारसा संपर्क येऊ दिला नाही. जीना एकदोनदा हैद्राबादी येऊनही गेले होते. परंतु त्यांना हवा तसा मान देण्यात आला नाही.

याच इत्तेहादच्या मार्फत निजाम हिंदु-मुस्लिम जातीय तणाव हवे तसे वाढवीत असे. मुस्लिमांशी ऐक्य म्हणजे इत्तेहादशी ऐक्य असे समीकरण रूढ झाले होते. मुसलमानांना राज्यकर्त्यांचा बहुमान इतिहासाने दिला असल्याने कोणत्याही सुधारणांत त्यांचाच वरचष्मा राहावा व हिंदू बहुसंख्या सदैव अल्पसंख्य म्हणूनच सत्तेत सहभागी व्हावी असा इत्तेहाद व निजाम यांचा दृष्टिकोण होता. मवाळांच्या दुसऱ्या गटात प्रामुख्याने सरंजामदार, जाहगीरदार, जमीनदार, वतनदार व त्यांचे हितसंबंध जपणारे लोक होते. स्वामीजी राजकीय क्षितिजावर आले तेव्हापासून त्यांची उपेक्षा करण्याचे व त्यांना डावलून इतरांशी वाटाघाटी करण्याचे धोरण अनुसरण्यात आले. स्टेट काँग्रेसचे म्हणजे बहुसंख्य जनतेचे नेतृत्व स्वामीजींकडे जाऊ नये असाच यामागे हेतू होता. स्वामीजींचा विशेष असा की, त्यांनी सरकार-दरबारचे अर्ज विनंत्यांचे, वाटाघाटींचे नेमस्त राजकारण पार वजा केले व सरळ जनशक्तीच जागृत केली. ते स्वतः संन्यासी असल्याने व वैचारिक निष्ठांमुळे ते जसे गांधीवादी होते तेवढेच लोकशाही समाजवादीही होते. जबाबदार राज्यपद्धतीच्या कल्पनेत राजकीय आशयाच्या बरोबर सामाजिक आणि आर्थिक आशय भरण्याचे प्रयत्न स्वामीजींच्याच नेतृत्वाखाली झाले. अगदी राष्ट्रीयीकरणापर्यंत व जमिनींच्या मालकीची मर्यादा कमी करून कुळांना व प्रत्यक्ष जमीन कसणारांना अधिकार द्यावेत इथपर्यंतचे अनेक अधिकार स्वामीजींमुळेच मुखरित झाले. मवाळांच्या मदतीने निजामाने व इत्तेहादने आजाद हैद्राबादचा जो कुटिल डाव खेळन बघितला त्याला स्वामीजींच्या नेतृत्वानेच गाडून टाकले. हैद्राबाद हिंदी संघराज्यात पूर्णतया विलीन झाले व त्याचे त्रिभाजन होऊन

निजामाच्या सरंजामी हैद्राबादचे नावनिशाण उरले नाही, त्याचे सर्व श्रेय स्वामीजींच्या नेतृत्वालाच द्यावे लागेल. शेख अब्दुल्लांनी नवीन काश्मीरचा पुरोगामी व समाजवादी आराखडा तयार केला होता. त्याच धर्तीवर स्वामीजींनी हैद्राबादची कल्पना केली होती. फरक एवढाच होता व फार महत्त्वाचा होता की, स्वामीजींच्या हिशेबी भारतीय संघराज्याखेरीज हैद्राबादला वेगळे अस्तित्व नव्हते व कुठल्याही निमित्ताने स्वामीजींना ते वेगळेपण टिकवावयाचे नव्हते. काळाने स्वामीजींच्याच बाजूने कौल दिला. त्यांना आपले हे स्वप्न पूर्ण करण्यासाठी थोरामोठ्यांची नाराजी पत्करावी लागली. विजनवासातही जावे लागले. परंतु हा राजकीय परिव्राजक शेवटपर्यंत आपल्या ध्येयपथापासून ढळला नाही. इतिहासानेच तशी साक्ष अधोरेखित केली आहे.

# ८

# स्वातंत्र्याचा अंतिम लढा

बेचाळीसच्या लढ्यानंतरची चार वर्षे हैद्राबाद संस्थानच्या व स्वामीजींच्या जीवनात अत्यंत खडतर अशी गेली. स्टेट काँग्रेसवरची बंदी उठविण्यास सरकार तयार नव्हते. गांधीजींनी तर स्वामीजींना असा सल्ला दिला होता की, त्यांनी प्रांतिक परिषदांत न जाता एकाकी-पणे का असेना परंतु स्टेट काँग्रेसचा ध्वज फडकत ठेवावा. परंतु सर्वसामान्य जनता किती वेळ ताटकळत बसणार? स्वामीजींनी या अवधीत राज्याच्या तिन्ही भागांत खेडोपाडी दौरे करून संघटनेच्या उभारणीची उत्तम तयारी केली. त्यांना भरपूर कार्यकर्ते व अनुयायी मिळत गेले. स्वतः स्वामीजी चार-पाच भाषा उत्तम प्रकारे बोलत असत. कानडी व मराठी तर त्यांच्या मातृभाषाच होत्या. ते उत्तम तेलगू जाणत. इंग्रजीवर त्यांचे प्रभुत्वच होते. शाळेत शिक्षक असतानाच ते उर्दू शिकले होते. त्यामुळे त्यांना हिंदीही चांगले येत असे. त्रिभाषिक किंबहुना चतुर्भाषिक हैद्राबादेत स्वामीजींची प्रतिमा सर्व हैद्राबादी जनतेचे पुढारी म्हणूनच पुढे येत गेली. भाषा आणि प्रदेश यांची बंधने त्यांनी केव्हाच ओलांडली होती. त्यांच्या कार्याचा मुख्य आधार खरे म्हटले तर मराठवाडा हाच होता. परंतु मराठवाड्यात संघटनेची व आंदोलनाची सर्व जबाबदारी सांभाळून संपूर्ण हैद्राबादला आपल्या-बरोबर नेणारे सहकारी नेतृत्व उदयाला आले होते. गोविंददास श्रॉफ यांच्यासारखा जाणता संघटनाकुशल सहकारी स्वामीजींना मिळाला होता. वाघमारे यांची लेखणी व बाबासाहेब परांजपे यांची वाणी

यांच्या संयोगाने मराठवाड्याची भूमी उत्तरोत्तर तापत गेली व स्वामीजी आंध्र-कर्नाटकात फिरण्यासाठी मोकळे राहिले. दोन्ही प्रदेशांत स्वामीजींमुळे समर्पित कार्यकर्त्यांची चांगली बळकट सेना उभी राहिली.

स्टेट कॉंग्रेसवरची बंदी उठण्याची वाट तिन्ही प्रांतांतील लोकांनी बघितलीच नाही. कार्यकर्त्यांनी आंध्र, महाराष्ट्र व कर्नाटक या परिषदाच कार्यक्षम करण्यास सुरुवात केली. आडून आणि आडपड्याने जबाबदार राज्यपद्धतीचा व नागरी स्वातंत्र्याचा जो उच्चार होत असे तो आता प्रांतिक परिषदांतून उघडउघड होऊ लागला. मराठवाड्यातील महाराष्ट्र परिषदेने तर सरळ सरळ आपले ध्येयच जबाबदार राज्य-पद्धती हे ठेवले. परिषदेची नंतर जी तीन-चार अधिवेशने झाली तिच्यांत स्वामीजींची उपस्थिती नेहमीच प्रेरक ठरत राहिली. प्रत्येक अधिवेशनाने नवाच संघर्ष उभा केला. पूर्णवेळी कार्यकर्त्यांच्या नेमणुका तालुका पातळीपर्यंत झाल्या. लोकांच्या दैनंदिन जीवनातील अडी-अडचणींसाठी हे कार्यकर्ते व प्रांतिक संघटना शासनाशी नित्य संघर्ष तर करीतच गेल्या परंतु काही निवडक प्रश्नांवर तीव्र संघर्ष उभे राहिले. उघडउघड राजकीय बंडखोरी वाढू लागली. महाराष्ट्र परि-षदेच्या पाठोपाठ आंध्र आणि कर्नाटक परिषदांनीही जबाबदार राज्य-पद्धतीचे ध्येय स्वीकारले. सरकारने स्टेट कॉंग्रेसवर बंदी टाकली तर लोकांनी त्यातून असा मार्ग काढला. स्टेट कॉंग्रेसची गरजच भासू नये अशी परिस्थिती निर्माण झाली.

बाहेर स्वातंत्र्याचे तांबडे फुटण्यास प्रारंभ झाला. ब्रिटिश पार्ले-मेंटरी डेलिगेशन, क्रिप्स मिशन वगैरेंशी प्रत्यक्ष स्वातंत्र्याच्या वाटाघाटी सुरू झाल्या. निजामाच्या शासनाने बंदी टाकूनदेखील लोकांनी आपली राजकीय संघटना व आपला राजकीय नेता यांची अंतिम निवड करून घेतली. स्वामीजींना शासनाने कुठेही मान्यता दिली नाही. उलट त्यांना शह बसेल व त्यांचे नेतृत्व पुढे येणार नाही यासाठी नेमस्तांना हाताशी धरून चळवळी फोडण्याचे उद्योग शासनाने करून पाहिले. परंतु काही उपयोग झाला नाही. परिस्थितीनेच शेवटी निजामाची मानगूट

पकडली व शासनाने ३ जुलै १९४६ ला आपण होऊन स्टेट कॉंग्रेसवरची बंदी उठविली.

सरकारला बंदी उठविणे भाग पडावे यासाठी आणखी एक महत्त्वाचे कारण घडून आले. तिन्ही प्रांतिक परिषदा संघटित झाल्या व त्या वाढत गेल्या. त्याचबरोबर तिन्हींना एकत्र आणण्याचे जे प्रयत्न जे. सी. सी. च्या नावाखाली झाले होते ते बरेच यशस्वी ठरण्याची चिन्हे दिसू लागली. नेमस्त, मवाळ आणि जहाल नाइलाजाने एकत्र आले व त्यांनी तिन्ही परिषदांची मिळून एक संघटना निर्माण करण्याचा जवळ-जवळ निर्धार केला. शासन यामुळेही अगतिक झाले. त्याने शेवटी परत एकदा नेमस्तांना हाताशी धरून व्यापक जनआंदोलनात फूट पाडण्याचा कट करून बघितला. स्वामीजी व जहाल यांना वगळून मवाळांना परत वाटाघाटींसाठी बोलावण्यात आले. त्याच त्या जुन्या अटींचे पाढे वाचण्यात आले. गंमत अशी की, बाहेरची राजकीय परिस्थिती मूलतः बदलल्यामुळे अ. भा. कॉंग्रेसवरची हैद्राबादेतील बंदी उठविण्यात आली होती. मात्र स्टेट कॉंग्रेसवर बंदी होती. ही विसंगती शासनाच्या लक्षात आली व नाव बदला, बाहेरच्या संघटनांशी संबंध ठेवू नका, राजाशी एकनिष्ठ राहण्याची हमी द्या व सनदशीर व घटनात्मक मार्गानेच राजकीय कार्य करा अशा काही अटी मांडण्यात आल्या. जे. सी. सी.मध्ये खल होऊन बहुमताने या अटी फेटाळण्यात आल्या. २१ मार्च १९४६ ची ही घटना आहे. दरम्यान पंडितजींच्या अध्यक्षतेखाली संस्थानी प्रजा-परिषदेच्या स्थायी समितीची बैठक झाली. तीत हैद्राबादविषयी ठराव संमत करण्यात आला व त्याद्वारे संस्थानी शासनाला अखेरचा इशाराच देण्यात आला. स्टेट कॉंग्रेसवरची बंदी उठवा, जबाबदार राज्यपद्धती अमलात आणा व नागरी स्वातंत्र्ये बहाल करा असा हा इशारा होता. आता पूर्वीप्रमाणे संस्थानी जनता वेगळी व ब्रिटिश भारतातील जनता वेगळी असा फरक राहिलेला नव्हता. राष्ट्राबरोबर स्वातंत्र्याची कल्पनाही एकात्म झाली होती. या ठरावाच्या शेवटी निःसंदिग्ध शब्दांत असे सांगितले होते की, निजाम सरकारने स्टेट कॉंग्रेसवरची बंदी उठविली नाही तर बंदीची पर्वा न करता स्टेट

काँग्रेस आपले अस्तित्व चालू ठेवील व लोकांच्या हक्कांसाठी संघटना उभारील. तिला तसा हक्कच आहे. या ठरावाच्या अंमलबजावणीसाठी एक समिती कायम करण्यात आली होती. तिचे अध्यक्ष स्वामीजीच होते.

या सर्व काळात स्वामीजींचा जास्तीत जास्त संबंध जसा गांधीजींशी वाढत गेला त्याचप्रमाणे भारतीय नेत्यांपैकी प्रामुख्याने पंडित नेहरू, सरदार पटेल, मौलाना आजाद प्रभृतींशीही त्यांचा परिचय वाढत होता. पंडितजी अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदेचे अध्यक्षच होते. उदयपूर अधिवेशनाच्या वेळी स्वामीजींच्या आग्रहावरूनच हैद्राबादेतील आंध्र, महाराष्ट्र व कर्नाटक या तीन परिषदांना संस्थानी प्रजा परिषदेच्या स्थायी समितीवर व प्रतिनिधी मंडळावर प्रतिनिधित्व देण्यात आले होते. संस्थानी जनतेच्या प्रश्नासंबंधी निर्णय घेण्याचा आता जेव्हा जेव्हा प्रसंग येई त्या प्रत्येक वेळी पंडितजी व सरदार पटेल शेख अब्दुल्लांप्रमाणेच स्वामीजींशीही सल्लामसलत करीत असत. संस्थानी प्रजा परिषदेच्या नेतृत्वात शेख अब्दुल्लांच्या बरोबरीनेच स्वामीजींचाही समावेश झाला होता. स्वामीजींच्या आग्रहावरूनच शेखसाहेब हैद्राबादेत आले होते व त्यांनी स्वामीजींच्या नेतृत्वाखालील स्टेट काँग्रेसच्या स्वातंत्र्य आंदोलनाला पाठिंबा दिला होता. शेखसाहेबांची एक प्रचंड सभा हैद्राबादी झाली. स्वामीजीच तिचे अध्यक्ष होते. त्यांनीच शेखसाहेबांचा परिचय करून दिला. शेखसाहेब त्या सभेत स्पष्ट म्हणाले होते की, हैद्राबादेतील बहुसंख्य जनतेचा लढा हा आम्ही काश्मिरी जनतेचाच लढा मानतो. हा लढा अपयशी झाला तर त्यात आमचीच हानी आहे असे आम्ही समजतो. बहुसंख्य जनता मुस्लिम व संस्थानिक हिंदू अशी अगदी उलट परिस्थिती असलेल्या काश्मीरच्या नेत्याने हैद्राबाद संस्थानातील स्टेट काँग्रेसला पाठिंबा द्यावा या घटनेला त्या काळी विशेष अर्थ होता. स्वामीजी व शेखसाहेब संस्थानी प्रजा परिषदेच्या निमित्ताने खूप जवळ आले. उत्तम मित्र बनले. परंतु पुढे त्यांचे राजकीय मार्ग भिन्न ठरले. शेखसाहेबांनी विलीनीकरणाच्या बाबतीत निराळी भूमिका घेतली तर स्वामीजींनी हैद्राबादच्या केवळ

विलीनीकरणाचाच नव्हे तर त्रिभाजनाचा आग्रह धरला व तो तडीस नेला.

बंदी उठल्यानंतर दोन-तीन महत्त्वाची कामे स्वामीजींसमोर होती. प्रांतिक परिषदांच्या रूपात स्टेट काँग्रेसची संघटना आयतीच तयार होती. या परिषदांना स्टेट काँग्रेसमध्ये सामावून घेणे आवश्यक होते व स्टेट काँग्रेसची रीतसर रचना करण्याची निकड होती. पहिले काम तसे सोपे होते. परंतु आंध्रमध्ये हे सोपे कामच अवघड झाले होते. प्रांतिक परिषदांत सर्वांत जुनी आंध्र महासभा होती. आरंभी ती निखळ सामाजिक व शैक्षणिक होती. नंतर राजकीय बनत गेली. रवि नारायण रेड्डी यांच्या नेतृत्वाखाली ग्रामीण तरुणांचा जो गट आंध्र महासभेत आला होता तो पुढे कम्युनिस्ट पक्षात सामील झाला. या गटाने आंध्र महासभेवर संपूर्ण ताबा मिळविला होता. कार्यकर्ते त्यांचेच जास्त होते. कामही त्यांचेच होते. याविरुद्ध नेमस्तांची व मवाळांची स्थिती होती. या गटाचे नेते एम. नरसिंहराव हे एक जुने पत्रकार होते. त्यांच्यापाशी ना कार्यकर्ते होते ना त्यांची संघटना होती. कम्युनिस्टांशी त्यांचे मतभेद वाढत गेले व एम. नरसिंहराव यांनी वेगळी राष्ट्रीय आंध्र महासभा स्थापन केली. स्वामीजींनी या दोन्ही गटांत समझोता घडवून आणण्याचा प्रयत्न केला. याच वेळेपासून स्वामीजींवर अशी सातत्याने टीका होऊ लागली की, ते कम्युनिस्ट धार्जिणे आहेत. वस्तुतः स्वामीजींनी कम्युनिस्ट रवि नारायण रेड्डी वगैरेंना तुकडे न पाडता स्वातंत्र्याच्या संयुक्त उद्दिष्टासाठी एकत्र काम करण्याचा सल्ला दिला होता. मात्र त्यांचे जे कार्य तेलंगणातील खेड्यापाड्यांत व प्रामुख्याने गरीब शेतमजुरांत व शेतकरी रयतेत वाढले होते त्याची त्यांनी प्रशंसा तेव्हा केली होती. नेमस्तांना हे रुचले नाही. तथापि जेव्हा मतभेद वाढले स्वामीजींच्यामुळेच जे. केशवराव, कोमरगिरी नारायणराव, माडपाटी रामचंद्रराव, हयग्रिवाचारी, कोदाटी नारायणराव एम. एस. राजलिंगम् या राष्ट्रवादी परंतु पुरोगामी तेलगू युवकांचा एक गट उभा राहिला व अखेरपर्यंत त्याने एकीकडे कम्युनिस्टांचा व दुसरीकडे नेमस्तांच्या आडून

काम करणाऱ्या जमीनदारांचा समर्थपणे मुकाबला केला. याच गटामध्ये पुढे चालून पी. व्ही. नरसिंहराव, के. व्ही. नरसिंहराव या जहाल युवक नेत्यांची भर पडली. कम्युनिस्ट व राष्ट्रवादी यांचे हे भांडण शेवटी स्टेट कॉंग्रेस ज्या संस्थानी प्रजा परिषदेशी संलग्न होती तिच्या कार्यकारिणीसमोर गेले. तेथे कम्युनिस्टांच्या आंध्र महासभेऐवजी राष्ट्रवादी आंध्र परिषदेला मान्यता मिळाली. या घटनेमुळे स्वामीजींवर कम्युनिस्टधार्जिणेपणाचा ठपका आला असला तरी पुढे कम्युनिस्टांनी तेलंगणच्या नावावर जो हिंसक उठाव केला व स्वयंनिर्णयाच्या नावावर भारताच्या विभाजनाचा पुरस्कार केला एवढेच नव्हे तर इत्तेहादुल मुस्लिमीन व निजाम सरकार यांच्या बरोबरीने आजाद हैद्राबादची कल्पना उचलून धरली, त्या प्रत्येक वेळी स्वामीजीच कम्युनिस्टांच्या विरोधात खंबीरपणे उभे राहिले व त्यांच्या या दूरदृष्टीमुळेच तेलंगणात पुरोगामी युवकांचा एक प्रबळ लढाऊ गट तयार झाला. जमिनीच्या व कूळवहिवाटीच्या प्रश्नांवर स्वामीजींनी जमीनदारांना सक्त विरोध केला व शेतमजूर, भूमिहीन व रयत यांचीच बाजू घेतली. पुरोगामी राष्ट्रवादी शक्ती तेलंगणात टिकली ती केवळ याचमुळे. मराठवाडा आणि कर्नाटक यामधील प्रांतिक परिषदांनी स्टेट कॉंग्रेसमध्ये विलीन होण्याचे ठराव आधीच केले होते. अशा रीतीने तिन्ही परिषदांचे विलीनीकरण होऊन स्टेट कॉंग्रेस अस्तित्वात तर आली. आता प्रश्न होता तिची कार्यकारिणी व स्थायी समिती निवडण्याचा. सभासद नोंदणी फार मोठ्या प्रमाणावर झाली. खेडोपाडी स्टेट कॉंग्रेसच्या शाखा कायम झाल्या. संघटनात्मक निवडणुकाही धडाक्यात झाल्या. परंतु त्यामध्येच मतभेदांचे प्रतिबिंब उमटले. पुरोगामी व मवाळ यांच्या दोन गटांत चुरस होतीच ती या निवडणुकांमुळे उजागर झाली. ओघानेच वातावरणात स्पर्धा व तणाव निर्माण झाले. आता अंतिम प्रश्न होता या स्टेट कॉंग्रेसचे अध्यक्ष कोणी व्हावे ? तिन्ही प्रांतांतील पुरोगामींनी व आजपर्यन्त जेवढे लढे, सत्याग्रह, दैनंदिन संघर्ष ज्यांनी लढविले त्यांनी एकमुखाने स्वामीजींचे नाव अध्यक्षपदासाठी सुचविले. नेमस्त आणि मवाळ संघर्षापासून अलिप्तच राहिले होते. त्यांनी बी.

रामकृष्णराव यांची उमेदवारी घोषित केली. अर्थातच स्वामीजी प्रचंड मताधिक्याने निवडून आले व त्यांच्याच अध्यक्षतेखाली आठ वर्षांच्या बंदीनंतर स्टेट काँग्रेसचे पहिले अधिवेशन हैद्राबाद शहरात १६, १७ आणि १८ जून १९४७ ला झाले. जनतेचा उत्साह दुथडी भरून वाहत होता.

अधिवेशनाच्या काळात म्हणजे ते चालू असतानाच तेव्हा गृह-खात्याचे सचिव असणारे व पुढे स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारताचे परराष्ट्रातील वकील व राज्यपाल झालेले नबाब अलियावर जंग यांनी स्वामीजींना बोलावून घेतले. या अधिवेशनासाठी बाहेरील काँग्रेसचे प्रतिनिधी व आमंत्रित पाहुणे म्हणून प्रा. एन. जी. रंगा, कमलादेवी चट्टोपाध्याय वगैरे उपस्थित होते या लोकांना अधिवेशनात बोलू देऊ नये, तसेच स्वामीजींनी आपल्या भाषणात जबाबदार राज्यपद्धतीची व्याख्या विशद करताना जे भाष्य केले आहे ते सरकारच्या दृष्टीने आक्षेपार्ह आहे. सबब तो भाग वगळावा अशी नबाबसाहेबांनी सूचना केली. या वेळी हैद्राबादचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस हजर होते. स्वामीजींनी प्रत्येक गोष्टीला नकार दिला तेव्हा नबाबसाहेब म्हणाले की, सरकारने याची गंभीर दखल घेतली आहे. याचे परिणाम वाईट होतील. स्वामीजी म्हणाले, सरकारला जे योग्य वाटत असेल ते त्याने करावे. आम्ही जे काय करावयाचे ठरविले आहे ते विचारपूर्वक. त्यामुळे त्यात कसलाही बदल होणार नाही. परिणामांची आम्हाला कल्पना आहे. अधिवेशनात या घटनेचे तीव्र प्रतिसाद उमटले.

नबाब अलियावर जंग हे आधीपासूनच निजामाच्या सेवेत व मोठ्या हुद्द्यावर होते. त्यांनी या आधीही १९३८ मध्ये स्वामीजींचा राजकारणात जो प्रवेश झाला त्याची यथेच्छ कुचेष्टा केली होती. पहिल्या म्हणजे १९३८ च्या सत्याग्रहाच्या वेळी स्वामीजींनी हैद्राबाद शहराचे पोलिस कमिशनर असलेले नबाब रहमत यार जंग यांना एक पत्र पाठवून आपण सत्याग्रह करणार असल्याचे कळविले होते. त्या पत्राचा प्रारंभ नबाबसाहेबांना उद्देशून 'डियर स्वीट सेल्फ' असा करण्यात आला होता. पत्र संपविताना 'इन लॉर्ड' असे लिहिले होते.

अलियावर जंगांनी यावर कुचेष्टेचा असा शेरा मारला होता की, गंभीर राजकीय संघटनेची कार्यपद्धती अशी असल्याचे दिसते. कमिशनरांना मात्र या पत्राने हरभऱ्याच्या झाडावर चढविले आहे. हेच नबाबसाहेब पुढे स्वामीजींना धमकी देऊन ते वाकतात का हे पडताळून बघत होते. कालाची गती अगम्य खरी. नबाबसाहेबांवर पुढे परागंदा होण्याची पाळी आली. त्यांनीच नंतर टोपणनावाने टाईम्स ऑफ इंडियात लेखमाला लिहून निजाम, त्याचे प्रशासन व इत्तेहादुल मुस्लिमीन त्यांच्यावर प्रकाश टाकला होता.

स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या अधिवेशनाने संस्थानभर प्रचंड शक्तीच विमुक्त केली. या अधिवेशनाच्या नंतर काही महिन्यांतच भारत पूर्णपणे स्वतंत्र झाला. लोकांच्या स्वातंत्र्योर्मी आता अपूर्णावस्थेत राहायला तयार नव्हत्या तरी सरकार नाउमेद झालेले नव्हते. त्याने अधिवेशनाच्या आधी परत स्टेट कॉंग्रेसमधील मवाळांना हाताशी धरून सुधारणांना अंतिम स्वरूप देण्यासाठी एक अय्यंगार समिती नेमली होती. त्या सुधारणा राबवाव्यात असे मवाळांचे म्हणणे होते.

परंतु स्टेट कॉंग्रेसने त्यांचा अव्हेर केला व सुधारणांवर बहिष्कार टाकण्याचा आदेश दिला. स्वामीजींचा संदेश खेगोपाडी घुमला व या सुधारणांतहत झालेल्या निवडणुकांचा फार्स उघडा पडला. पेट्या रिकाम्याच गेल्या. स्वामीजींनी सरकारला आधीच कल्पना दिली होती की, लोक आता स्वातंत्र्याखेरीज कशातच समाधान मानायला तयार नाहीत. काळ पालटला आहे. त्याचा इशारा ओळखा. परंतु अलियावर जंग व त्यांचे सहकारी त्यांना अभिप्रेत असलेल्या ज्या तथाकथित राजकीय गांभीर्याने निजामाचे इस्लामी सरकार चालवीत होते, त्याला स्वामीजींची ही इशारत पुरेशी ठरली. विनाशाकडे जाणारांची बुद्धी विपरीतच असते. सुधारणा फसल्या व लोकांची स्वातंत्र्याकांक्षा उफाळत गेली.

आता स्टेट कॉंग्रेससमोरची वाट स्वच्छ होती. स्वामीजी याच क्षणाची वाट बघत होते. त्यांनी आता संस्थानाधिपतींना बजावले की, प्रथम हैद्राबाद संस्थान हिंदी संघराज्यात विलीन करा. लोकशाही व्यवस्था

आणा व हैद्राबादचे वेगळे अस्तित्व पूर्णतया संपवा. स्वामीजींना अटक होईल अशी भीती होतीच. या काळात शासनाने पुष्कळ लोक पकडले. शेवटपर्यंत म्हणजे पोलिस कारवाईपर्यंत निजामाच्या तुरुंगात वीस हजारांवर लोक होते व बाहेर जबरदस्त भूमिगत चळवळ खडी झाली होती. स्वामीजी या काळात गांधीजींना दिल्लीला जाऊन भेटले. पंडितजी व सरदार यांच्या सल्ल्याप्रमाणे त्यांनी संस्थानी जनतेला ७ ऑगस्ट रोजी हिंदी संघराज्यात संस्थान सामील करण्याचा दिन पाळण्याचा आदेश दिला. घरोघरी भारतीय स्वातंत्र्याचा प्रतीक असलेला तिरंगी ध्वज लावा, शाळा-कॉलेजांवर बहिष्कार टाका, कोर्ट-कचेऱ्या ओस पाडा व शांततेने निजामी कायदे मोडून स्वातंत्र्याचा उद्‌घोष करा. स्वामीजींचा हा आदेश राज्यभर मोठ्या उत्साहाने व सामर्थ्याने पाळला गेला. पुढे १५ ऑगस्ट हा भारताचा स्वातंत्र्यदिन म्हणूनच साजरा करण्याचे ठरले. सात ऑगस्टला स्वामीजींनी आपल्या खांद्यावर तिरंगी ध्वज घेऊन शहरात मिरवणूक काढली होती. ती प्रचंड मिरवणूक बघूनच सरकारचे धाबे दणाणले. स्वामीजींना अटक करून लगेच सोडून देण्यात आले. इतरांना शिक्षा ठोठावण्यात आल्या. पंधरा ऑगस्ट तर अधिकच तप्त वातावरणात साजरा झाला. स्वामीजींनी आपल्या आठवणींत यासंबंधी असे लिहिले की, भारतीय स्वातंत्र्याचा दिन साजरा होण्याच्या आधी त्यांची व पंडितजींची भेट झाली. पंडितजींनी स्वामीजींच्या हाती भारताचा राष्ट्रध्वज दिला व भारताच्या या ध्वजाची शान तुम्ही हैद्राबादी राखाल अशी आशा व्यक्त केली. १५ ऑगस्ट १९४८ च्या प्रातःकाळी स्वामीजी हैद्राबादेतील त्यांच्या सुलतान बाजारमधील निवासस्थानाबाहेर आले. त्यांनी पंडित-जींनी दिलेला ध्वज हजारो लोकांच्या उपस्थितीत व भारतीय स्वातंत्र्याच्या गगनभेदी जयजयकारात उभारला. त्याला वंदन केले. स्वामीजी या वेळी एवढेच म्हणाले की, या ध्वजाची शान राखता राखता मरण आले तर त्याहून अधिक मंगल मरण अन्य असणार नाही. चला आपण त्याच वाटेने जाऊ. पानसरे, भगतसिंग, राजगुरू ज्या अमर मार्गाने गेले तोच मार्ग हुतात्म्यांनी पुनीत केला आहे. त्या मार्गावर

पाऊल ठेवण्याची संधी आपल्या वाट्याला आली हे आपले केवढे भाग्य !

संस्थानभर हल्लकल्लोळ माजला. लोकांनी कशाचीही तमा न बाळगता सरकारी कचेऱ्यांवरही तिरंगी झेंडे फडकावले. सरकारी दडपशाहीने येथून पुढे फार वेगाने संस्थानाला विनाशाकडे ओढीत केले. स्वामीजींना १५ ऑगस्टला अटक करण्यात आली. या वेळी त्यांना चंचलगुडा, निजामाबाद व गुलबर्गा या तुरुंगांत ठेवण्यात आले.

स्वामीजींनी हैद्राबाद संस्थानात येण्यापूर्वी संघटना आपल्या पश्चात कार्यक्षम रीतीने चालू राहील व निजामविरोधी आंदोलनाला बाधा येणार नाही याची सर्व व्यवस्था केली होती. संस्थानात गेल्याबरोबर अटक होणार हे त्यांना माहीत होते. म्हणून स्वामीजींनी तीन प्रांतासाठी तीन सूत्रधार अनुक्रमे माडपाटी रामचंद्रराव ( तेलंगण ) गोविंददास श्रॉफ ( मराठवाडा ) आणि डॉ. मेलकोटे ( कर्नाटक व हैद्राबाद-सिकंदराबाद शहरे ) यांची नेमणूक केली. त्याचबरोबर श्री. दिगंबरराव बिंदू यांच्या नेतृत्वाखाली पाच जणांची एक कृति-समितीही त्यांनी नियुक्त केली. या कृति-समितीत श्री. बिंदू यांच्याखेरीज जे. के. प्राणेशाचार्य, गोविंददास श्रॉफ, जमलापूर केशवराव व डॉ. जी. एस. मेलकोटे यांचा समावेश होता. ही कृतिसमितीच इथून पुढचा संपूर्ण लढा चालविणार होती व लोकांना वेळोवेळी कार्यक्रम देणार होती. निजाम सरकार दडपशाही वाढवील व संस्थानात काम करू देणार नाही अशी अपेक्षा होतीच. म्हणून विजयवाडा, गदग, मनमाड येथे अनुक्रमे तेलंगण, कर्नाटक व मराठवाडा या विभागांची आंदोलन कार्यालये काढण्याचे ठरले. याखेरीज स्टेट काँग्रेसच्या केंद्रीय कार्यालयांसाठी मद्रास व मुंबई ही दोन ठिकाणे निवडण्यात आली. सर्व ठिकाणी कार्यालये सुरू झाली. स्वामीजींनी आपल्या आठवणींच्या संग्रहात एक मजेदार आठवण नमूद केली आहे. बाहेर कार्यालय उघडण्यासाठी स्टेट काँग्रेसजवळ पैसा नव्हता. संस्थानामधील धनिकांवर सरकारचे जबरदस्त दडपण होते. बाहेरील काँग्रेसच्या नेत्यांना भेटून काही निधी मिळतो का हे

नाचपण्याचे काम स्वामीजी करीत होते. त्यांना आश्वासने मिळाली होती. परंतु प्रत्यक्षात एक पैसाही मिळाला नव्हता. मुंबईला कार्यालय उघडण्यासाठी स. का. पाटील यांनी मुंबई प्रदेश काँग्रेस कचेरीत एक खोली दिली होती. परंतु पैसा नव्हता. अशा वेळी स्वामीजींची व जयप्रकाशजींची भेट मुंबईत पडली. पुढे ते दोघेही भूदान चळवळीचे जीवनदानी बनले. जयप्रकाशजी हे पहिले भारतीय नेते होते ज्यांनी प्रत्यक्ष आर्थिक मदत देवविली, त्यांच्या पैशावरच मुंबईचे कार्यालय सुरू झाले. स्वामीजींनी याचा उल्लेख अपार कृतज्ञतेने केला आहे. कचेऱ्या सुरू झाल्या खऱ्या, परंतु प्रश्न चळवळीच्या स्वरूपाचा व हिंसे-अहिंसेच्या संदर्भात धोरणांचा होता. संस्थानात इत्तेहादुल मुस्लिमीन या संघटनेला आता राजकीयदृष्टया फार महत्त्व आले होते. तिच्या एकूण रचनेत फार मोठे बदल झाले होते. बहादुर यार जंग यांच्या मृत्यूचा याआधी उल्लेख आलाच आहे. ते मोठ्या हताश अवस्थेत निवर्तले. मरण्याच्यापूर्वी त्यांनी आपल्या एका नजीकच्या मित्राला जे पत्र लिहिले ते सरकारी कागदपत्रांत आढळते.

निजामाबादी बहादुर यार जंग यांचे एक घनिष्ठ मित्र मौलवी गुलाम अहमद साहेब या नावाचे एक प्रतिष्ठित गृहस्थ होते. यार जंग ही उपाधी गेल्यानंतर मृत्यूच्या आधी त्यांनी या गुलाम अहमदांना एक खाजगी पत्र लिहून आपली व्यथा व्यक्त केली आहे. या पत्रात त्यांनी म्हटले आहे की, माझ्या हे पूर्णपणे लक्षात आले आहे की, हे सरकार ( निजामाचे ) माझे नाही. त्याला इस्लामी सरकार संबोधणे म्हणजे इस्लाम या परिभाषेची विटंबना करणेच होय. बहादुर यार जंग यांची निराशा पुढील शब्दांवरून दिसून येते. ते म्हणतात, हैद्राबादचे हे सरकार मुसलमानांच्या हातातून जाईल. हिंदी महासागरात त्याचे विसर्जन होईल व लाट विरावी तसे ते विरून जाईल. सरकार, त्यातील अधि-कारी व निजाम आपले ऐकत नाहीत. त्यांना समजावणे व्यर्थ आहे. मी स्वप्ने बघणारा माणूस आहे. इस्लामी राज्याचे माझे स्वप्न मी खरे करून दाखवीन अथवा माझे हे स्वप्न उराशी बाळगून नेहमीसाठीच डोळे मिटीन. पत्राच्या शेवटी ते लिहितात की, ‘ वास्तव मला स्पष्ट

दिसते आहे की, तो स्वर्गीय पिता, त्याचा पुत्र आणि त्यांचा आत्मा आणि त्यांच्या आदेशांचे सार नाहीसे होत असून त्याची जागा ब्रह्मा, विष्णू आणि शिव घेत आहेत. '

बहादुर यार जंगांच्या नंतर इत्तेहादुल मुस्लिमीनमध्ये समंजस व नेमस्त विचारांचा गट काही काळ वर आला. मौलवी अबुल हसन सय्यद अली अध्यक्षपदी निवडले गेले. ते जबाबदार राज्यपद्धतीचे पुरस्कर्ते होते व गोष्टी पराकोटीला नेण्याच्या ते विरुद्ध होते. कासिम रझवी याच गटाशी प्रथम संबंधित होते. त्यांनीच पुढे अबुल हसन सय्यद अलींच्या विरुद्ध बंड केले व निवडणुकीत त्यांचा दणदणीत पराभव करून स्वत: रझवीच इत्तेहादचे अध्यक्ष झाले. या रझवींच्या काळात इत्तेहादची रझाकार नावाची सशस्त्र व जहाल शाखा उदयाला आली. बहुतेक खेड्यांतून तिच्या शाखा होत्या. तरुण मुसलमान तिचा सभासद होता. निमलष्करी स्वरूपाचीच ही संघटना होती. हैद्राबाद शहरात याच संघटनेच्या लोकांनी रझवीच्या चिथावणीवरून उर्दू पत्र-सृष्टीत राष्ट्रवादी व निर्भीड पत्रकार म्हणून नुकताच पुढे येणारा शोएबउल्ला खान यांची भरदिवसा रस्यावर कत्तल केली होती. २२ ऑगस्ट १९४८ चा तो दिवस होता. रझवी म्हणाला होता की, आमच्या विरोधी जाईल त्याचे हात कलम करू. शोएबचे प्रथम हातच तोडण्यात आले व नंतर शिर. त्या आधी २१ ऑक्टोबर १९४६ ला नांदेड जिल्ह्यात बिलोली आणि कोंडलवाडीच्यामध्ये अर्जापूर या गावाजवळ रझाकारांनी काँग्रेसचे गांधीवादी कार्यकर्ते गोविंदराव पानसरे यांची तलवारींनी खांडोळी केली होती. त्यांच्या मृत्यूच्या नंतर महिना-दोन महिन्यांनी याच ठिकाणी पानसरे यांना श्रद्धांजली वाहण्यासाठी प्रचंड यात्रा भरली असता गोळीबार झाला व चार माणसे ठार झाली. परि-स्थिती शोएबच्या कत्तलीपर्यंत येऊन ठेपली होती. निजाम नवी अद्ययावत शस्त्रे मिळवीत होता व जुनी शस्त्रे देऊन रझाकारांची निमसरकारी सेना तयार करीत होता. अलियावर जंग यांनीच या संबंधीची आकडेवारी दिली आहे. सशस्त्र रझाकारांची संस्थानात एकूण संख्या दोन लक्ष होती. याखेरीज निजामाचे नियमित लष्कर ४२ हजारांचे व ज्या पठणांना

निजामाने मुद्दाम आणले होते त्यांची संख्याही हजारोंच्या घरात होती. त्याचप्रमाणे हैद्राबादमधील हिंदूंची बहुसंख्या कमी करण्यासाठी भारतीय प्रांतातून महाजरीन म्हणजे निर्वासित या नावाखाली लक्षावधी मुस्लिम स्त्री–पुरुष आणविले गेले होते. निजामाने शस्त्रास्त्रांसाठी २२ कोटी रुपये खर्च केले होते. यावरून परिस्थितीची कल्पना यावी.

शांततेने चळवळ करण्याचे दिवस संपले होते. रझाकारांचा सशस्त्र उत्पात सर्वत्र माजत चालला होता. स्वामीजींनी ही सर्व परिस्थिती गांधीजींच्या कानी घातली. गांधीजी तेव्हा दिल्लीत भंगी कॉलनीत राहत होते. स्वामीजी त्यांना असे म्हणाले की, या रझाकारांचा एक तर शस्त्रांनिशी मुकाबला करावा लागेल अथवा लोकांना हैद्राबाद संस्थानातून परागंदा व्हावे लागेल. गांधीजींनी तेव्हा स्पष्ट सांगितले होते की, भ्याडासारखे पळून जाण्यापेक्षा अनिष्टाचा सामना करणे मी श्रेयस्कर व उचित समजतो. ही परवानगी घेऊनच स्वामीजींनी कृति-समितीची बैठक घेतली. तिला पुढील कार्यक्रम आखण्याचे पूर्ण स्वातंत्र्य दिले आणि स्वामीजी संस्थानात प्रविष्ट झाले.

त्यांच्या अटकेनंतर सत्याग्रह, जंगल सत्याग्रह, झेंडा सत्याग्रह फार मोठ्या प्रमाणावर झाले. रझाकार व सरकार चेकाळले. त्यांचे अत्याचार वाढले. त्यामुळे हैद्राबादच्या सीमेवर कृति-समितीने जिल्हावार केन्द्रे काढली. शस्त्रास्त्रे मिळवून निजामी हद्दीत घुसून जकात नाकी, पोलिस ठाणी नष्ट केली. रेल्वे रूळ व इतर वाहतूक अनेकदा खंडित करण्यात आली. सीमेलगतची काही खेडी काँग्रेसने स्वतंत्र केली व संस्थानापासून तोडली. स्वामीजींवर नंतर या सर्व घटनांचे निमित्त करून फार टीका करण्यात आली. कृति-समितीने एवढे अवधान कडकपणे बाळगले होते की, चुकूनदेखील मानवहत्या होऊ नये. शासनाच्या यंत्रणेवर हल्ले करावेत. मात्र मनुष्यहानी करू नये. या सर्व कार्यक्रमांचे यशस्वी संचलन स्वामीजींनी नेमलेल्या कृति-समितीने केले. स्वामीजी कम्युनिस्टधार्जिणे आहेत व हिंसावादी आहेत. काँग्रेसच्या ध्येयधोरणांशी त्यांनी प्रतारणा केली अशी टीका पोलिस कारवाईनंतर सत्तेच्या

डावपेचांतून त्यांच्यावर करण्यात आली. स्वामीजींना तेव्हा फार सोसावे लागले. परंतु तो तो त्यांची लोकप्रियता वाढत गेली.

स्वामीजी तुरुंगात असतानाच भारत सरकारने, निजामाशी जैसे थे करार केला. ( २९ नोव्हेंबर १९४७ ) स्वामीजींना हे तुरुंगात समजले. तेव्हा त्यांनी आपली इतराजी नेत्यांच्या कानी घातली. पोलिस कारवाईनंतर स्वामीजींना सोडण्यात आले. ते ज्या तुरुंगात होते त्यावर ( निजामाबाद ) रझाकारांनी हल्ला केला होता. परंतु स्वामीजी व अन्य सत्याग्रही त्यातून वाचले.

जैसे थे कराराचा निजामाने भंग केला. मिर्झा इस्माईलसारखा माणूसही अगतिक होऊन निघून गेला. अशा अवस्थेत पोलिस कारवाई अनिवार्य झाली. १३ सप्टेंबर १९४८ ला पोलिस कारवाई सुरू झाली व १७ सप्टेंबरला संपली. त्याच दिवशी स्वामीजींची हैद्राबादच्या तुरुंगातून सुटका करण्यात आली. पोलिस कारवाई होऊन निजाम शरण आला आहे व लायकअली मंत्रिमंडळाने राजीनामा दिला आहे. परिस्थिती ताब्यात ठेवण्यासाठी स्वामीजींची बाहेर आवश्यकता आहे हे स्वामीजींना तुरुंगात पटविण्यात आले, तेव्हाच ते इतर सत्याग्रहींना तुरुंगात ठेवून बाहेर येण्यासाठी तयार झाले. एक शाळामास्तर म्हणून एका खेडयात आलेल्या एका संन्याशाच्या नेतृत्वाखालीच निजामी सत्तेचा अंत झाला. कासिम रझवीच्या साऱ्या वल्गना वाऱ्यावर विरून गेल्या. काळानेच रझवीवर सूड उगवला. लायकअली पळून गेला. रझवीला अटक झाली व निजाम मात्र टोपी बदलून भारतीय संघराज्यात सामील झालेल्या हैद्राबाद राज्याचा पहिला राजप्रमुख झाला. एवढया प्रचंड उलथापालथीत हे एक नवलच वर्तले.

❦ ❦

९

# पोलिस कारवाईनंतर

स्टेट काँग्रेसने सत्याग्रहाचे जे आंदोलन चालविले त्यात २० हजारांवर लोक तुरुंगात गेले होते. पुढे रझाकारी अत्याचार वाढल्यावर स्टेट काँग्रेसच्या कृतिसमितीने जमेल त्या प्रकारे प्रतिकार करण्याची मुभा दिली व सीमावर्ती केंद्रामार्फत सशस्त्र प्रतिकाराची चळवळ संघटित केली. पोलिस कारवाई करणे ज्या कारणामुळे आवश्यक झाले त्यांतले एक कारण या सशस्त्र चळवळीचे होते. तिने पोलिस कारवाईचा मुहूर्त अलीकडे खेचून आणला. अवघ्या ५ दिवसांत पोलिस कारवाई संपूर्ण झाली. स्वामीजींना काही दिवस आधी गुलबर्गा व संगा रेड्डी तुरुंगातून हैद्राबादच्या चंचलगुडा तुरुंगात आणून ठेवले होते. एके दिवशी त्यांना सोडून देण्यात आले हे आपण आधीच्या प्रकरणात बघितलेच आहे. परिस्थिती झपाट्याने बदलत गेली. लायकअली हा जो निजामाचा पंतप्रधान होता त्याला अटक करण्यात आली. पोलिस कारवाईनंतर लगेचच इत्तेहादुल मुस्लिमीनचा माथेफिरू अध्यक्ष कासिम रझवी यालाही अटक झाली.

स्वामीजींना सोडण्यात आले त्या वेळी संस्थानात दोन कामे फार अगत्याची होती. एक तर संस्थानात शांतता स्थापन होणे, हिंदु–मुसलमानांत तणाव निर्माण न होणे व स्टेट काँग्रेसच्या ज्या सैनिकांपाशी शस्त्रे होती, ती लष्करी शासनाला परत करणे. ही कामे स्वामीजींनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी फार नेटाने व निष्ठेने केली. स्वामीजींनी

आपल्या आठवणींत या संबंधी असे लिहून ठेवले आहे की, त्यांची (स्वामीजींची) सुटका झाल्याबरोबर भारताचे एजंट जनरल के. एम्. मुन्शी यांचा त्यांना निरोप आला की, त्यांनी मुन्शींच्या निवासस्थानी त्वरित पोचावे. त्यानुसार स्वामीजी तेथे गेले. मुन्शी बाहेर जाण्याच्या तयारीत होते. म्हणाले, मी निजामाच्या भेटीला जात आहे. तुम्ही तोंवर येथेच थांबावे. मुन्शींची ही थाप होती हे पुढे उघडकीस आले. मुन्शी नभोवाणीवर भाषण करायला गेले होते. दिल्लीच्या व विशेषत: पंतप्रधानांच्या सूचना मिळण्याची वाट न बघताच त्यांनी हैद्राबाद नभोवाणीवरून भाषण केले व हिंदी लष्कराला शरण येण्याचा निजामाला सल्ला दिला. स्वामीजी मुन्शींच्या निवासस्थानी बसून रेडिओवर हे ऐकत होते. ते अस्वस्थ झाले. मुन्शी निजामाला भेटायला गेले नव्हते तर! ते परत आले तेव्हा स्वामीजींनी त्यांना पहिला प्रश्न हाच केला की, तुम्ही निजामाला शरण जाण्याचा सल्ला का दिला? मुन्शींनी उत्तर टाळले. ते दिल्लीचा ट्रंक घेण्यासाठी गेले. दरम्यान होऊ नये ते झाले. निजाम अलगद वाचला. मुन्शींचा सल्ला त्याने पडत्या फळाची आज्ञा म्हणून मानला. त्यानेही नभोवाणीवरून भाषण केले व आपली शरणागती दिली. जे काही घडले ते आपल्या इच्छेच्या विरुद्ध, इत्तेहाद व रझाकार या माथेफिरूंमुळे. आपण निरपराध होतो अशी त्याने संपादणी केली. हैद्राबादच्या इथून पुढच्या राजकारणाला निराळेच वळण लागले. निजामाला मुन्शींनी वाचवले व हा केवळ अपघात नव्हता तर हैद्राबादेतील प्रतिगामी व सरंजामी शक्तींनी योजनाबद्ध रीतीने तयार केलेला हा कट होता याची संगती सहजपणे लागते.

स्टेट कॉंग्रेसमध्ये मवाळांचा, राजनिष्ठांचा प्रभावी असा एक गट होता की, ज्याने कॉंग्रेसच्या आंदोलनात भाग तर घेतलाच नाही उलट त्या आंदोलनाला बदनाम करण्याचा प्रयत्न केला. निजाम, इत्तेहादुल मुस्लिमीन व निजामांचे अधिकारी यांच्याशी या मवाळांचे आधीपासूनच संधान जुळलेले होते. त्यांच्यापैकी एक पं. जी. रामाचारी यांनी संघटनेची पर्वा न करता मंत्रिमंडळात भाग घेतला होता. इतरांनी

तडजोडी चालविल्या होत्या. आपले हे कारस्थान सुरळीत पार पडावे म्हणून त्यांनी दोन डावपेच बुद्धिमत्तेने योजिले होते. हे डावपेच असे की, एक तर स्वामीजींना त्यांच्या नियंत्रणातील स्टेट कॉंग्रेसला व त्यांच्या पुरोगामी सहकाऱ्यांना कम्युनिस्ट ठरवावे आणि दुसरे म्हणजे त्यांच्यावर हिंसेचा आरोप करून ते कॉंग्रेसविरोधी, गांधीद्रोही आहेत असा बोभाटा करावा. दुसरीकडे मुन्शींना आपलेसे करून घेऊन निजामाशी तडजोड करावी. पुढे घडले ते असे : निजाम वचावला, त्याला राजप्रमुखपद व प्रचंड तनखा मिळाला. लायकअली पळून गेला. रझवीला फाशी न होता तो नुसताच शिक्षा होऊन पाकिस्तानात पोचला.

स्वामीजींनी तुरुंगात असताना जैसे थे करार होण्याच्या आधी व नंतर स्वत: लायकअली व इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस त्यांना भेटण्यासाठी तुरुंगात आल्याचा संक्षेपाने उल्लेख आपल्या आठवणींत केला आहे. लायकअली म्हणाला होता की, हिंदी संघराज्याशी काय जे बोलायचे ते आम्ही बोलू. तुम्ही संस्थानांतर्गत जबाबदार राज्य-पद्धतीविषयी बोला. स्वामीजी म्हणतात की, लायकअलीच्या बरोबर आणखी एका व्यक्तीला बघून मला आश्चर्य वाटले. नंतर आय. जी. पी. च्या मार्फत स्वामीजींसमोर तडजोडीची एक योजना मांडली गेली. तिचे स्वरूप थोडक्यात असे : पहिल्या तीन वर्षांत हैद्राबाद संस्थानाच्या विधिमंडळात ७५ टक्के मुसलमान व २५ टक्के मुसलमानेतर असतील. तीन वर्षांनंतर हे प्रमाण ५०:५० टक्के होईल आणि पुढे सहा वर्षांनंतर उलटे म्हणजे मुसलमानेतर ७५ टक्के आणि मुसलमान २५ टक्के. (मुसलमानांचे लोकसंख्येतील प्रमाण फक्त ११ टक्के होते.) आणखी एक कलम दुसरे दिवशी वाढविण्यात आले. ते असे की, भारत आणि पाकिस्तान यांच्या दरम्यान युद्ध झाले तर हैद्राबाद तटस्थ राहील. स्वामीजींनी हे सर्व इरादे ठोकरून लावले. पुढे स्टेट कॉंग्रेसच्या संघटनात्मक निवडणुका सुरू झाल्या व पक्षात दोन तट पडले तेव्हा वृत्तपत्रांनी एक गौप्यस्फोट असा केला होता की, मवाळांच्या वतीने बी. रामकृष्णराव यांनी लायकअलीशी एक करार केला होता. त्यानुसार ५५–४५ असे हिंदू–मुस्लिम प्रतिनिधित्वाचे प्रमाण ठेवून हंगामी मंत्रिमंडळ बनवावे

हैद्राबादसाठी घटना समिती बोलवावी. रझाकार कारवाया बंद कराव्यात. ही योजना स्टेट काँग्रेसला मान्य झाली नाही, तर बी. रामकृष्णराव व इतरांना ती अंमलात आणण्याची मुभा द्यावी. एप्रिल १९४८ मध्ये मुंबई येथे अ. भा. काँ. कमिटीची जी सभा झाली तेथे ही योजना राष्ट्रीय नेत्यांना दाखविण्यासाठी नेली होती. काँग्रेसच्या कृति–समितीला ( हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या ) तिचा पत्ता लागला तेव्हा तिने या कारस्थानाचा जाहीर निषेध केला व स्वामीजींखेरीज कोणी कसल्याही प्रकारच्या वाटाघाटी करू नयेत असे पत्रक काढले. बी. रामकृष्णराव यांनी इन्कार केल्यानंतर वृत्तपत्रांनी हा गौप्यस्फोट प्रकाशित केला होता. ( फ्रीडम–दि. २३ जानेवारी १९४९ ) स्वामीजी आणि बी. रामकृष्णराव असे दोन गट स्टेट काँग्रेसमध्ये पडले व त्यांचे मतभेद निकराला गेले. ते कोडे उमजण्यास ही घटना उपयोगी पडू शकेल.

मुन्शी यांनी या आधी म्हणजे निजामाला वाचविण्याच्या आधी लायकअली पंतप्रधान असताना एक पत्र पाठवून स्वामीजींना मुक्त करावे अशी इच्छा व्यक्त केली होती. मुन्शी यांनी यांच्या 'End of an era' या ग्रंथात हा तपशील आपल्या सोयीनुसार दिला आहे. स्वामीजींनी हिंसक कृत्यात भाग घेतला व त्यांच्या नेतृत्वाखालील स्टेट काँग्रेसने कम्युनिस्टांशी संगनमत केले म्हणून लायकअली स्वामीजींना सोडण्यास तयार नव्हते. मुन्शींनी लायकअलींना पत्र लिहून विपर्यास केला. हिंसक चळवळीत भाग घेण्याचा त्यांचा आरोप यासाठी बरोबर नाही की, स्वामीजी या काळात तुरुंगातच होते. शिवाय त्यांनी सरदार पटेलांना आपण हिंसक कृत्यांत भाग घेणार नाही असे आश्वासन दिले होते. त्यांना सोडले तर भारत सरकारला आनंद होईल व जनताही त्याचे स्वागत करील. मुन्शींचे हे विधान शंभर टक्के असत्य आहे. सरदार पटेलांशी या बाबतीत आपण कधीच बोललो नव्हतो असे स्वामीजींनी म्हटले आहे. पुढील राजकारणाची निदर्शक वळणे या सर्व घटनाक्रमात आपण तपासू शकतो.

मुन्शी आपला डाव साधून चुकले होते. त्यांना पंडितजींनीच पंतप्रधान म्हणून सांगितले की, हैद्राबादेत आता लष्करी राजवट नसूअ

ज. जे. एन्. चौधरी तिचे प्रमुख आहेत. सर्व निर्णय ते घेतील. मुन्शी यानंतर एजंट जनरल राहिले नाहीत. परंतु भावी राजकारणाची पेरणी त्यांनी आधीच करून ठेवली होती.

स्वामीजींनी अनेकदा प्राण जोखमीत घालून संस्थानात शांतता प्रस्थापित करण्यास मदत केली. मुस्लिम जनतेचे नीतिधैर्य संपले होते. त्याचा गैरफायदा हिंदूंनी घेता कामा नये म्हणून त्यांनी आपली सर्व शक्ती वापरली. स्टेट काँग्रेसच्या स्वयंसेवकांनी व कार्यकर्त्यांनी आपली कामगिरी चोख बजावली. सरहद्दीवर जी सशस्त्र लढ्याची केंद्रे होती ती पोलिस कारवाईच्या पाठोपाठ बंद करण्यात आली आणि विशेषत्वाने नमूद करण्यासारखी गोष्ट अशी की, या सीमावर्ती केंद्रापाशी असणारी सर्व लहान–मोठी शस्त्रास्त्रे शासनाच्या रीतसर स्वाधीन करण्यात आली. तरी पण स्वामीजींच्या विरोधकांनी त्यांना बदनाम करण्यासाठी या घटनेचा पुरेपूर उपयोग केला.

आंदोलनाला अपशकून करण्याचे प्रतिगाम्यांचे उद्योग आधी-पासूनच चालू होते. स्टेट काँग्रेसच्या तेव्हाच्या कृतिसमितीने आपल्या मद्रासच्या बैठकीत त्यांची (२० मे १९४८) गंभीर दखल घेतली व चौघांच्याविरुद्ध शिस्तभंगाचा इलाज केला. या चौघांमध्ये नंतर मुख्यमंत्री झालेले बी. रामकृष्णराव, महसूलमंत्री झालेले कोंडा व्यंकट रंगारेड्डी, हैद्राबाद विधानसभेचे अध्यक्ष झालेले काशीनाथराव वैद्य आणि तेव्हाचे एक धनिक राजा लक्ष्मीनिवास गणेरीवाल यांचा समावेश होता. स्वामीजींना पोलिस कारवाईनंतर या घटनेचे भलेबुरे अनेक परिणाम भोगावे लागले. हा जर वैचारिक व आर्थिक हितसंबंधांचा संघर्ष होता असे मानले तर त्या संघर्षाचा प्रारंभ–बिंदू ही शिस्तभंगाची कारवाईच होती

स्वामीजींची या सर्व प्रश्नांसंबंधीची भूमिका स्पष्ट होती. त्यांना हैद्राबादचे अस्तित्व चालू ठेवणे कदापि मान्य नव्हते. भारताच्या पोटात वाढलेले हे गळू आहे. त्याचे ऑपरेशनच झाले पाहिजे. त्रिभाषिक हैद्राबाद लगतच्या त्या त्या भाषिक राज्यात विसर्जित केले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. काँग्रेस संघटनेने असेच ठराव केले. लष्करी राजवट

संपवून लोकनियुक्त मंत्रिमंडळासाठीही स्वामीजोंनी व त्यांच्याबरोबरच्या पुरोगामी गटाने जबाबदार राज्यपद्धतीचा आर्थिक आणि सामाजिक विस्तार करताना शेतजमिनीच्या मालकीहक्कांत, कुळवहिवाटीत, स्वामित्व, मर्यादेत सुधारणा, गैरहजर जमीनदारीला पूर्णविराम, सर्व प्रकारचे सरंजामी अवशेष म्हणजे, जाहागिरी, सर्फेखास, पायगा इत्यादी बरखास्त करणे या गोष्टींवर भर दिला होता. निजामाला राजप्रमुख करू नये, त्याला व इतर संस्थानिकांना तनखे देऊ नयेत याही मागण्या प्रामुख्याने करण्यात आल्या होत्या. तेलंगणमध्ये फार मोठ्या प्रमाणावर जमीनदारी होती. नबाब, जाहगीरदार, जमींनदार यांना हा हल्ला सहन झाला नाही. त्यांनी राजकीय हालचालींचा अचूक मागोवा घेतला व समान हितसंबंधींना एकत्र आणले. स्वामीजींच्या विरोधात असणाऱ्या मवाळ व प्रतिगामी लोकांनी या गटाचे नेतृत्व केले. हा सुमारे दोन वर्षांचा काळ आहे. स्वामीजींच्या वैचारिक निष्ठा या काळात कसोटीला लागल्या. ज्या अखिल भारतीय नेतृत्वावर त्यांचा विश्वास होता तेही व्यवहाराच्या नावावर किती तडजोडी करीत होते, हेही त्यांना याच काळात समजून आले. स्टेट काँग्रेस आता सर्वांत मोठी व बलवान राजकीय संघटना बनली होती. शिवाय राजकीय सत्ता मिळविण्याचेही ते एक प्रमुख साधन होते. म्हणून प्रतिगामी आणि पुरोगामी सर्वांनीच संघटनेवर लक्ष केंद्रित केले. फार मोठ्या प्रमाणावर (साडेबारा लक्ष) सभासद नोंदणी झाली. सत्तेत प्रतिगामी जाता कामा नयेत यावर पुरोगाम्यांचा कटाक्ष होता तर प्रतिगाम्यांचा नेमका उलटा आग्रह होता. याच दिशेने मोर्चेबंदी सुरू झाली.

कृति–समितीचे आदेश पाळले नाहीत व आंदोलनात भाग घेतला नाही म्हणून ज्या चौघांना संघटनेतून निलंबित केले होते त्यांनी या संधीचा पुरेपूर फायदा घेतला. ज्या कारणासाठी शिस्तभंगाचा इलाज योजण्यात आला होता ती कारणे प्रदेश, जिल्हे व तालुके या पातळी-पर्यंत झिरपत गेली. आंदोलनात भाग न घेता स्टेट काँग्रेसशी उघड उघड द्रोह करणारे तालुका पातळीपर्यंत पुष्कळच होते. या सर्वांना या चौघा मवाळ नेत्यांनी संघटित केले. शिस्तभंगाच्या इलाजाला प्रतिस्पर्धी काँग्रेस संघटना काढून प्रत्युत्तर देण्यात आले. या प्रतिस्पर्धी काँग्रेसचे

अध्यक्ष स्वत: जनार्दनराव देसाई झाले व बी. रामकृष्णराव तिचे चिटणीस झाले. एक विचित्र परिस्थिती निर्माण झाली. आरंभी अ. है. काँ. स. व प्रतिनिधी इथपर्यंत सुमारे शंभर–सव्वाशे लोक शिस्तभंग करणारे निघतील अशी अपेक्षा होती. परंतु ती संख्या बरीच वाढली. हे लोक आयतेच प्रतिस्पर्धी काँग्रेसला जाऊन मिळाले. हैद्राबादेतील सर्व धनिक वर्ग, जाहगीरदार, नवाब, ज्यांचे हितसंबंध बाधित झाले ते सर्व निजाम आणि इत्तेहादच्या सुप्त पाठिंब्यासह प्रतिस्पर्धी काँग्रेसच्या मागे उभे राहिले. स्वामीजी व त्यांच्याइतकेच त्यांचे निष्ठावंत सहकारी गोविंददास श्रॉफ या काळात अत्यंत कठोर टीकेचे लक्ष्य बनले. बहुतेक वृत्तपत्रे प्रतिस्पर्धी गटाचीच होती. त्यांनी अपप्रचाराची एकच राळ उडविली. स्वामीजींवर फॅसिस्ट असल्याचा आरोप केला. हैद्राबाद संस्थानाच्या इतिहासातील हा स्वातंत्र्योत्तर संघर्ष अनेक गोष्टींवर प्रकाश टाकतो. काश्मीरपासूनच स्वामीजी व गोविंदभाईंनी शोषणरहित व्यवस्था निर्माण करण्याची प्रेरणा घेतली होती. काश्मीरच्या नॅशनल कॉन्फरन्समध्ये हितसंबंधी लोकांना सभासद बनता येत नसे. सभासदत्व मुक्त नव्हते. त्याच धर्तीवर हैद्राबादेतही निजाम आणि जाहगीरदार, जमीनदार यांचे बगलबच्चे दूर ठेवावेत असा स्वामीजींचा प्रयत्न होता. परंतु दुर्दैवाने त्यांना भारतीय नेतृत्वाची साथ मिळू शकली नाही.

स्टेट काँग्रेसच्या कार्यकारिणीने ३० जून १९४७ ला जी कृति-समिती नियुक्त केली होती ती पोलिस कारवाईनंतर २४ ऑक्टोबर १९४८ ला विसर्जित केली, नंतर २९ ऑक्टोबर १९४८ च्या का. मं. च्या बैठकीत एक चौकशी समिती मुक्रर करण्यात आली. आंध्र प्रदेश काँग्रेसचे (तेलंगण) अध्यक्ष जमलापूर केशवराव, महाराष्ट्र प्र. काँ. चे अध्यक्ष मुकुंदराव पेडगावकर (मराठवाडा) आणि कार्यकारिणीचे कर्नाटकातील सदस्य जगन्नाथराव चंद्रकी यांची या समितीवर नियुक्ती झाली. चंद्रकी या समितीचे संयोजक होते. ज्या चौघांवर शिस्तभंगाचा इलाज योजण्यात आला, त्यांची चौकशी करण्याचे काम या समितीकडे देण्यात आले होते. या समितीने आपला अहवाल २९ नोव्हेंबर १९४८ ला सादर केला. पुढे ८ डिसेंबर १९४८ च्या का. मं. च्या बैठकीत या अहवालावर विचार झाला व समितीने दिलेला पर्याय

स्वीकारण्यात आला. म्हणजे या चौघांची अधिकारपदे रद्द करून त्यांना येत्या संघटनात्मक निवडणुकीस उभे राहण्याची मुभा देण्यात आली. स्वामीजी एकीकडे गोरगरीब जनतेची बाजू घेऊन प्रस्थापित हित-संबंधींशी संघर्ष करीत होते तर दुसरीकडे त्यांचे सौजन्यच त्यांना अडचणीत आणीत होते. फुटीर त्याचाच फायदा घेत होते. चौकशी समितीने मूळ इलाज सौम्य केला तो स्वामीजींच्या सौजन्याचाच निदर्शक होता.

या समितीने आपल्या अहवालात नमूद केलेले निष्कर्ष व मवाळांवरचे आरोप हैद्राबादमधील कटकारस्थानी सरंजामशाही लक्षात येण्यासाठी समजून घेणे आवश्यक आहेत. अहवालाचा संक्षिप्त सारांश असा होता.

१) निजामाच्या विरुद्ध हैद्राबादची जनता निर्णायक लढा देत होती. तेव्हा या मंडळींनी किसान मजदूर प्रजापार्टी या नावाचा एक पक्षच काँग्रेसअंतर्गत कायम केला होता. वैद्य सोडून बाकीचे या पक्षाचे सभासद आहेत. या पक्षाने आपला वेगळा जाहीरनामाही काढला होता. स्वामीजींनी पोलीस कारवाईच्या नंतर स्टेट काँग्रेसच्या कार्यकारिणीची पुनर्रचना केली तेव्हा या गटाचे बी. रामकृष्णराव व जनार्दनराव देसाई यांना कार्यकारिणीवर येण्याचे आवाहन केले होते. तेव्हा त्यांनी इन्कार तर केलाच परंतु आम्हाला आमच्या पक्ष चिटणीसाच्या मार्फतच आमंत्रण आले पाहिजे असे कळविले होते.

स्टेट काँग्रेसची अशी भूमिका होती की, पहिल्या श्रेणीचा भर हैद्राबाद संस्थाने हिंदी संघराज्यात सामील होण्यावर दिला पाहिजे, त्यानंतर जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीचा क्रम असावा. या क्रमानेच स्टेट काँग्रेसने इतर कार्यक्रमांबरोबरच प्राधान्याने हिंदी संघराज्याचा ध्वज राष्ट्रध्वज म्हणून सर्वत्र फडकवावा असा आदेश दिला होता. या गटाने संघराज्यात सामील होण्याला विशेष महत्त्व नसल्याचे सांगून कर्नूलच्या बैठकीत ध्वज फडकवू नये असा निर्णय घेतला. त्याऐवजी या कि. म. प्र. पक्षाने २८ सप्टेंबर १९४७ हा जबाबदार राज्यपद्धती दिन म्हणून साजरा करण्याचा स्वतंत्र कार्यक्रम दिला. २८ सप्टेंबरला

व्यंकट रंगा रेड्डी सत्याग्रह करणार होते म्हणून त्यांना २५ डिसेंबरलाच अटक करण्यात आली.

२) या गटाने आंदोलनाचे आदेश तर पाळले नाहीतच उलट ज्यांच्याविरुद्ध लढा होता त्यांच्याशी लपून-छपून वाटाघाटी केल्या. ५ डिसेंबर १९४७ ला. बी. रामकृष्णराव यांनी गृहखात्याचे चिटणीस जहीर अहमद यांची भेट घेतली व त्यांच्याशी वाटाघाटी केल्या. परंतु १२ मार्च १९४७ रोजी पंतप्रधान झालेल्या लायकअलीलाच ते भेटले. लायकअली भेटू इच्छितात असा निरोप हैद्राबादचे दुसरे एक धनिक राजा पन्नालाल पित्ती यांनी आणला. बी. रामकृष्णराव भेटायला तयारच होते. ते म्हणाले, भेटीसाठी लेखी पत्र आले तर बरे. ही गोष्ट ११ मार्चची. लगेच लायकअलींचे पत्र आले व दोघांमध्ये वाटाघाटी झाल्या. ५५–४५, ६०–४०, ५०–५० अशा प्रमाणातील हिंदू–मुस्लिम प्रतिनिधित्वाची कोष्टके चर्चिली गेली. लायकअलींनी रामकृष्णरावांकडून अशी अपेक्षा केली की, त्यांनी वाटाघाटी यशस्वी करण्याच्या कामी मदत करावी. (लायकअली स्वामीजींना तुरुंगात भेटल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे.) स्टेट काँग्रेसचे इतर पुढारी भावनाशील आहेत रामकृष्णराव वास्तववादी भूमिकेने विचार करणारे आहेत असे लायक-अलींचे मत होते. या भेटीत सामिलीकरणाऐवजी जबाबदार राज्य-पद्धतीवरच भर देण्यात आला. स्वतः बी. रामकृष्णराव यांनी कार्य-कारिणीकडे जो खुलासा केला त्यातही आपण लायकअलींशी बोललो हे कबूल केले आहे. गणेरीवाल यांनी आपल्या खुलाशातही या गोष्टीची कबुली दिली व आणखी अशी माहिती दिली की, कॅम्पबेल या पत्र-काराला खाना दिला होता त्या वेळीच लायकअलींनी बी. रामकृष्णराव यांच्याशी बोलण्याची इच्छा व्यक्त केली होती व त्यांनी तसा होकारही दिला होता.

या मंडळींनी पुढे १९४८ च्या एप्रिल महिन्यात पन्नालाल पित्ती यांच्या मार्फत अ. भारतीय काँग्रेस कमिटीच्या बैठकीच्या वेळी एक तड-जोडीची योजना पाठविली होती. रामकृष्णराव यांचे म्हणणे असे की, ही योजना खुद्द के. एम्. मुन्शी यांचीच होती. मुन्शी यांनी शेवटपर्यंत

या प्रश्नी मौन बाळगले. संघटनात्मक निवडणुकीच्या काळात वृत्तपत्रांनी जो गौप्यस्फोट केल्याचे वर म्हटले आहे ते या संदर्भात लक्षात घेतले तर स्वामीजी व त्यांचे सहकारी कोणाशी संघर्ष करीत होते हे समजेल. आणखी दोन घटना याचसंबंधी नमूद करण्यासारख्या आहेत.

कासिम रझवीला बीबीनगर खून खटल्यात १९ डिसेंबर १९४८ ला अटक झाली. बरेच दिवस त्यांच्यावर भरण्यात आलेला खटला चालला. रझवीने या खटल्याच्या दरम्यान कोर्टासमोरच अशी जबानी दिली की, काँग्रेसचे पुढारी आज जे मोठी ऐट मिरवीत आहेत तेच त्या काळी माझी मनधरणी करीत होते की, मी काही तरी तडजोड करावी. रझवींनी या पुढाऱ्यांची नावेदेखील कोर्टाला सांगितली.

पोलिस कारवाईच्या नंतर मुन्शी घाईघाईने रेडियोवर गेले व तेथे त्यांनी जे भाषण केले त्याचा उल्लेख वर आलाच आहे. नंतर म्हणजे पोलिस कारवाईच्या पाचव्या दिवशी दि. १७ सप्टेंबर १९४८ ला खुद्द निजामाने— उस्मान अलीखानने— नभोवाणीवरून शरणागतीचे जे भाषण केले त्यात मुन्शींचा खास उल्लेख आहे. निजामाने म्हटले की, मी माझे मित्र के. एम्. मुन्शी यांच्याशीही सल्लामसलत केली. मी या संधीचा उपयोग करून मुन्शींनी मला जी मदत केली त्याविषयी कृतज्ञता व्यक्त करतो. निजामाने याच शरणागतीच्या भाषणात लायकअलींचे मंत्रिमंडळ बरखास्त केले व नियमित मंत्रिमंडळ नेमण्याची संधी मिळेपर्यंत आपण एक कमिटी नेमीत असल्याचे घोषित केले. ही समिती पुढीलप्रमाणे होती. प्रिन्स ऑफ बेरार—कमांडर इन चीफ, मेजर जनरल एल्. इदरुस, कमांडर, नबाब दीन यार जंग, पोलिस कमिशनर, पंडित जी. रामाचारी, माजी मंत्री, अबुल हसन सय्यद अली, इत्तेहादचे माजी अध्यक्ष, व पन्नालाल पित्ती.

हैद्राबादेतून संसदेवर जे पहिले सोळा प्रतिनिधी नियुक्त करण्यात आले त्यांत यांपैकी काही नावे आढळतात.

संघटनात्मक निवडणुकीच्या निमित्ताने एक जबरदस्त संघर्षाचे वातावरण तयार झाले. याच काळात उभय गटांत तडजोडीचे बरेच

प्रयत्न झाले. पंडितजी आणि सरदार पटेल येऊन गेले. पंडितजींच्या भेटीच्या आधी व नंतर त्यांचे व्यक्तिगत चिटणीस श्री. द्वारकानाथ कचरू आले होते. ते उभय गटांशी बोलले व पंडितजींशी मल्लामसलत करून त्यांनी आपला पर्याय सुचविला. कचरू पर्याय म्हणून तो पुढे प्रसिद्धी पावला. या पर्यायान्वये स्वामीजींनी ज्या चौघांचे सभासदत्व निलंबित केले होते व त्यांना संघटनेच्या निवडणुकीस दोन वर्षे उभे राहण्याची मनाई केली होती, त्यात बदल केला. त्या अन्वये अखिल है. काँ. कमिटीच्या ज्या सभासदांनी आंदोलनात भाग घेतला नाही त्यांना निवडणुकीत भाग घेण्यावर जी बंदी टाकली होती, ती स्वामीजींनी परत घेतली. स्वामीजींनी तशी घोषणा महबूब कॉलेजात एका जाहीर सभेत दि. १ जानेवारी १९४९ ला केली. परंतु फुटिरांचे समाधान झाले नाही. नंतर सरदार पटेल २६ फेब्रुवारी १९४८ ला हैद्राबादी आले. त्यापूर्वीच पटेलांच्या सांगण्यावरून उभय गटांत तडजोड झाली. वस्तुत: हा स्वामीजी गटावर घोर अन्याय होता. परंतु पटेलांचे म्हणणे ऐकले पाहिजे म्हणून स्वामीजींनी मान्यता दिली. या पटेल पर्यायानुसार–

१) शिस्तभंगाची कृती रद्द.

२) प्रतिस्पर्धी गटाने केलेल्या प्राथमिक सभासद नोंदणीस मान्यता.

३) अ. है. काँ. क. ने मान्य केलेल्या सभासद नोंदणीच्या नियमात बदल.

४) सभासद नोंदणी फॉर्म बदलून घेणे.

५) कार्यकारिणीची नव्याने फेररचना.

६) याच प्रकारचे बदल प्रदेश व जिल्हा पातळीपर्यंत करणे.

७) स्वामीजी व बी. रामकृष्णराव या दोघांनी आपसांत हे व इतर विवाद्य प्रश्न परस्पर समजुतीने सोडविणे.

सरदार येण्याच्या आधीच वातावरण निवळावे म्हणून या

तडजोडीची घोषणा करण्यात आली. स्वामीजींनी नवी कार्यकारिणी पुढीलप्रमाणे जाहीर केली.

१) दिगंबरराव बिंदू. २) गोविंददास श्रॉफ. ३) स. कृ. वैशंपायन. ४) जनार्दनराव देसाई. ५) अण्णाराव गणमुखी. ६) व्यंकट रंगा रेड्डी. ७) माणिकचंद पहाडे. ८) जगन्नाथराव चंद्रकी. ९) जमलापूर केशवराव. १०) पी. हनमंतराव. ११) भूमकंठी सत्यनारायणराव १२) के. व्ही. नरसिंगराव. १३) डॉ. चन्ना रेड्डी. १४) डॉ. जी. एस्. मेलकोटे. १५) बी. रामकृष्णराव. १६) जे. के. प्राणेशाचार्य– (सरचिटणीस).

परंतु सरदार पटेलांची पाठ वळताच फुटिरांनी नवीन वाद उकरून काढले. झालेल्या कराराचे निरनिराळे अर्थ काढण्यात आले. मुख्य प्रश्न दोन होते. १) उभय काँग्रेसचे एकमेकांत मीलन का प्रतिस्पर्धी काँग्रेसचे (देसाई) काँग्रेसमध्ये विसर्जन ? फुटीर स्वामीजींची काँग्रेस खरी व तेच या काँग्रेसचे अध्यक्ष हे मान्य करण्यास तयार नव्हते. त्याचप्रमाणे त्यांना कार्यकारिणीवर आठ सदस्य हवे होते. शिवाय गोविंददास श्रॉफ व त्यांचे सहकारी कम्युनिस्ट व मार्क्सवादी म्हणून त्यांना काँग्रेसमधून काढून टाकावे अशी त्यांची मागणी होती.

स्वामीजी या सर्व अवधीत अनेक प्रकारच्या दबावाखाली वावरत होते. त्यांना दिल्लीला पंडितजींचा आधार वाटत असे. नव्या हैद्राबादची सत्ता प्रतिगाम्यांच्या हाती जाऊ नये अशी त्यांची धडपड होती. या कामी पंडितजींची साथ मिळेल अशी त्यांना अपेक्षा होती परंतु तसे झाले नाही. हैद्राबाद प्रश्नी सरदार पटेल लक्ष घालीत होते व त्यांचा फार मोठा आधार फुटिरांना मिळत गेला. त्यामुळेच फुटीर झालेली तडजोड स्वीकारीनात.शेवटी स्वामीजींनी राजीनामा देण्याचा देकार दिला तोपर्यंत संघटनात्मक निवडणुकांचे निकाल आले होते. बहुतेक ठिकाणी स्वामीजींचीच सरशी होती. दोन्ही गटांची सभासद नोंदणी एकत्र केली तरी स्वामीजीच निवडून येणार हे जवळ जवळ नक्कीच दिसत होते. फुटिरांनी म्हणूनच तडजोड नाकारली. त्यांनी तडजोड केली ती स्वामीजींचा राजीनामा स्वीकारून व त्यांच्या जागी दिगंबरराव बिंदू

यांचे नाव अध्यक्ष म्हणून मान्य करून. ही तडजोडही दिल्लीमध्येच झाली. अशा रीतीनें हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या सभासदांतील प्रचंड बहुसंख्येने ज्या स्वामीजींची अध्यक्षपदी निवड केली होती व त्यांच्या सहकाऱ्यांच्याच हाती संघटनेची सूत्रे दिली होती त्यांचा पराभव राज्यातील प्रतिगाम्यांनी व स्थितिवाद्यांनी केंद्रीय नेत्यांच्या आशीर्वादाने घडवून आणला. राजकीय पावले पुढे अशीच पडत गेली.

जनरल चौधरी यांच्या लष्करी राजवटीऐवजी नागरी प्रशासन नेमण्यात आले. स्वामीजींनी आधीपासूनच ही मागणी केली होती. मवाळांच्या गटालाही पूर्ण सत्ता आपल्या हाती हवी होती. परंतु त्यांना कारभाराच्या लोकशाहीकरणाची अगर नागरीकरणाची घाई नव्हती. संघटनेतील वाद स्वामीजींच्या विरोधात व मवाळांना अनुकूल मिटविण्यात आल्यानंतर १२ जून १९५० रोजी एम्. के. वेलोडी यांच्या मुख्यमंत्रिपदाखाली नवे मंत्रिमंडळ नियुक्त करण्यात आले. त्यात स्वामीजी गटाचे दोघे म्हणजे फूलचंद गांधी व व्ही. बी. राजू यांना तर मवाळांतर्फे स्वतः बी. रामकृष्णराव व विनायकराव कोरटकर यांना घेण्यात आले. त्यांच्याखेरीज झैन यार जंग, सी. व्ही. एस्. राव आणि शेषाद्री या नागरी प्रशासकांनाही मंत्रिमंडळात घेण्यात आले.

लोकसभेवर हैद्राबादेतून जे १६ नियुक्त सभासद घेण्यात आले त्यांत स्वामीजींच्या अनुयायांना अत्यल्प प्रतिनिधित्व मिळाले. उलट स्थितिवाद्यांनी मोठा भाग गट्ट केला. नेमण्यात आलेल्या १६ जणांत पुढील लोकांचा समावेश होता :–

बी. रामकृष्णराव गट :– डॉ. चन्ना रेड्डी, पंडित जी. रामाचारी, पन्नालाल पित्ती, काशीनाथराव वैद्य, के. व्ही. रंगा रेड्डी, पद्मजा नायडू, हरिश्चंद्र हेडा, अबुल हसन सय्यद अली, जे. एच. सुबय्या, अर्गे रामस्वामी, पुली रामस्वामी आणि माणिकलाल गुप्ता (एकूण १२)
स्वामीजी गट :– जमलापूर केशवराव, बॅ. श्रीधर वामन नाईक, अण्णाराव गणमुखी, मिर्झा बाकर अली बेग. (एकूण ४)

या घटना हैद्राबादेतील राजकीय परिवर्तनाची स्पष्ट दिशा दाखविणाऱ्या होत्या. स्वामीजींनी ती दिशा ओळखली व केंद्रीय नेत्यांचा

मार्ग निर्वेध करून देण्यासाठी स्वत: पडते घेण्याचे ठरविले. स्टेट काँग्रेसचे अध्यक्षपद त्यांनी आपण होऊन सोडून दिले व तडजोड म्हणून अध्यक्षपद बिंदूंच्या स्वाधीन केले. या भूमिकेचा परिणाम संस्थानातील काँग्रेस संघटनेवर फार गंभीर स्वरूपाचा झाला. कर्नाटक, तेलंगण व मराठवाडा या तीनही भागांतील जे जहाल व पुरोगामी कार्यकर्ते स्टेट काँग्रेसमध्ये होते, त्यांच्या वेगवेगळ्या बैठका झाल्या व सर्वांनीच असा निष्कर्ष काढला की, स्टेट काँग्रेसमध्ये पुरोगामी विचारांना आता वाव राहिलेला नाही. सबब आपण काँग्रेसमधून बाहेर पडावे. ही प्रक्रिया चार-पाच महिने चालली. तीनही भागांतील समाजवाद्यांनी स्टेट काँग्रेसचा त्याग आधीच केला होता. तेलंगणात पी. व्ही. नरसिंहराव व के. व्ही. नरसिंहराव ही तरुण जोडी विचाराने समाजवादी होती व प्रत्येक संघर्षात स्वामीजींच्या व गोविंदभाईंच्या बरोबर राहिली होती. समाजवाद्यांनी पक्षत्याग केला तेव्हाच हेही काँग्रेस सोडणार होते. परंतु तिन्ही विभागांतील कार्यकर्त्यांच्या बरोबर ते राहिले व मार्च-एप्रिल १९५० मध्ये त्यांनी सर्वांच्या बरोबर स्टेट काँग्रेसचा त्याग केला. कार्यकारिणीत गोविंददास श्रॉफ, स. कृ. वैशंपायन यांच्या बरोबरीलाच के. व्ही. नरसिंगराव होते. त्यांनी फेब्रुवारी १९५० मध्ये कार्यकारिणीचे राजीनामे दिले व पुढे ते पक्षातून बाहेर पडले.

परिणामी स्वामीजींची अवस्था पंख छाटलेल्या गरुडासारखी झाली. त्यांच्या दृष्टीने पंगू झालेल्या है. स्टेट काँग्रेसचे दुसरे अधिवेशन २, ३ मार्च १९५० मध्ये निजामाबादी झाले. या अधिवेशनात तडजोडीतून आलेले नवे अध्यक्ष श्री. दिगंबरराव बिंदू यांच्या हाती कार्यभार देताना स्वामीजींनी जे भाषण केले ते जवळ जवळ राजकीय क्षेत्राचा निरोप घेणारेच भाषण होते. अशा निरोपाच्या प्रसंगीही स्वामीजींनी हैद्राबाद संस्थानाचे तिन्ही भाषिक प्रांतांत विलीनीकरण झाले पाहिजे व जोवर हैद्राबाद अस्तित्वात आहे तोवर शेतजमिनीच्या कायद्यात मूलगामी स्वरूपाचे बदल केले पाहिजेत हे निक्षून सांगितले. अशा काही महत्त्वाच्या प्रश्नीच स्वामीजी केंद्राशी व इतर ज्या कोणाशी संघर्ष घेण्याची गरज असेल त्यांच्याशी तो घेण्यास तयार होते असे दिसते.

स्वामीजींनी इथून पुढे आपले लक्ष शिक्षण क्षेत्रावर केंद्रित केले. शिक्षण क्षेत्रातूनच ते राजकारणाकडे वळले होते. आता अर्धवट सोडलेला त्यांचा पूर्वीचा प्रवास परत सुरू झाला.

नांदेड येथे स्वामीजींच्या बरोबरच्या अनेकांना महाविद्यालय काढावे असे वाटत होते. अंबाजोगाईला-जेथून स्वामीजी राजकारणात आले होते, तेथेही हायस्कूलचा विस्तार महाविद्यालयात करण्याची निकड भासू लागली होती. शेवटी नांदेडला बैठक होऊन नांदेड एज्युकेशन सोसायटीची स्थापना करण्यात आली. या संस्थेतर्फेच २६ जून १९५० ला नांदेडच्या आताच्या पीपल्स कॉलेजचे उद्घाटन झाले. या कॉलेजचे नाव पूर्वी मराठवाडा कॉलेज असे ठेवण्याची कल्पना होती. काही दिवस तेच नाव रूढ झाले. परंतु स्वामीजींनी हे नाव वैचारिकदृष्टचा उचित नसल्याने पीपल्स कॉलेज असेच नांदेड कॉलेजचे नामकरण केले. या कॉलेजचा प्रारंभ सरकारी पैशांनी न होता स्वामीजींचे एक जुने निष्ठावंत सहकारी व प्रत्येक भल्याभुऱ्या प्रसंगी निश्चितपणे स्वामीजी व बाबासाहेब परांजपे यांची साथ करणारे एक धनिक राजा पूरणमलजी लाहोटी यांनी दिलेल्या एक लाख रुपयांच्या देणगीने झाला. लोकांनीही मोठ्या प्रमाणावर देणग्या दिल्या. या कॉलेजचे उद्घाटन तेव्हाचे मुख्यमंत्री एम्. के. वेलोडी यांच्या हस्ते झाले. लोकप्रतिनिधी म्हणून मंत्रिमंडळावर घेण्यात आलेले बी. रामकृष्णराव, फूलचंद गांधी व व्ही. बी. राजू आणि झैन यार जंग या कार्यक्रमाला आवर्जून हजर होते. स्वामीजींनी यावेळी जे भाषण केले, ते त्यांच्या राजकीय नितळ दृष्टीचे द्योतक होते. लोकांची जाणीव वाढविली पाहिजे, त्यासाठी शिक्षणावरच भर दिला पाहिजे, त्यांच्यातील सद्भाव आणि विवेकशीलता यांना साद घालणारेच संस्कार शिक्षणाने केले पाहिजेत. लोकशक्तीचा उदय अशा रचनात्मक कार्यातूनच होऊ शकेल, असा विश्वास स्वामीजींनी व्यक्त केला.

यावेळी मराठवाड्यात फक्त औरंगाबादी इंटरमिजीएट कॉलेज होते. याच सुमारास त्यावेळी केंद्रीय सरकारात कायदामंत्री असलेले स्वतः डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीही औरंगाबादी एक पदवी महा-

विद्यालय सुरू केले. पुढे फार झपाट्याने मराठवाड्यात शिक्षणाचा विकास झाला. तालुक्या-तालुक्यांतून महाविद्यालये निघाली. औरंगाबादी मेडिकल कॉलेज सुरू झाले. पाठोपाठ मराठवाडा विद्यापीठाची स्थापना झाली. मराठवाड्याच्या शैक्षणिक विस्ताराचा जणू प्रारंभच स्वामीजींनी नांदेड कॉलेजच्या स्वरूपात केला होता.

# १०

# संघटनेत फाटाफूट : संच विखुरला

हैद्राबाद राज्यात पूर्णतया नागरी प्रशासन यावे व लोकप्रतिनिधींच्या हाती सत्ता सोपवावी अशी स्वामीजींनी मागणी केली होती. तिच्याकडे सर्वस्वी दुर्लक्ष करणे अवघड होते म्हणून जनरल चौधरी यांच्याऐवजी एम्. के. वेलोडी यांची नियुक्ती करून त्यांच्या नेतृत्वाखाली लोकप्रतिनिधी म्हणून चौघांना मंत्रिमंडळात घेण्यात आले. स्टेट काँग्रेसमध्ये जो संघटनात्मक वाद शिगेला पोचला होता तोही कसाबसा मिटला. या सर्व काळात स्वामीजींनीच अत्यंत सहिष्णू व उदार भूमिका घेतली म्हणूनच काही गोष्टी घडून येऊ शकल्या. स्वामीजींनी हळूहळू दैनंदिन राजकारणातून आपले लक्ष काढून घेतले व विधायक कार्याकडे वळविले. तथापि हैद्राबाद राज्यासमोर ज्या मूलभूत समस्या होत्या त्याबाबतीत लोकमत तयार करणे, भारत सरकारवर सतत दबाव आणणे व या समस्यांसाठी सातत्याने आग्रह धरणे ही कामे स्वामीजींनी अधिक जोमाने चालू ठेवली. त्यांना या काळामध्ये आपल्या विचारांच्या प्रसारासाठी मुखपत्राची फार गरज वाटू लागली. शेवटी त्यांनी ३ एप्रिल १९५० रोजी 'व्हिजन' या नावाचे एक इंग्रजी साप्ताहिक हैद्राबादहून सुरू केले. सुमारे वर्षभर ते चालले आणि २६ मार्च १९५१ ला ते अंतर्धान पावले. प्रचलित आणि मूलगामी अशा विविध प्रश्नांवर स्वामीजींनी आपल्या या साप्ताहिकातून लिहिले. कधी शासनावर कोरडे ओढले तर कधी शासनाला मित्रत्वाचा सल्ला दिला.

स्टेट काँग्रेसच्या नेतृत्वासंबंधी तडजोड होऊन अध्यक्षपदी बिंदू यांची वरून नियुक्ती झाल्यामुळे स्टेट काँग्रेसच्या विभाजनास प्रारंभ झाला. संघटनेमध्ये स्वामीजींचा पुरोगामी गट म्हणून जो ओळखला जात होता, त्यापैकी अनेकांनी प्रथम स्टेट काँग्रेसच्या कार्यकारिणीचे राजीनामे दिले व नंतर काँग्रेस पक्षच त्यांनी सोडून दिला. या अशा लोकांमध्ये मराठवाड्यातील कार्यकर्त्यांची संख्या फार मोठी होती. स्वामीजींचा खरा आधार मराठवाडाच होता. येथे गोविंददास श्रॉफ यांच्यासारखा बुद्धिमान व संघटनाकुशल नेता स्वामीजींच्या पुरोगामी राजकारणाची दिशा ठरवीत असे. राज्यभर संघटनेचे जे कार्यकर्ते होते त्यांच्याशी गोविंददास श्रॉफ यांचा प्रत्यक्ष संबंध होता. मराठवाड्यात तर जवळजवळ सर्व मराठवाडाच काँग्रेसमधून बाहेर पडला. स्वामीजींचे बंधुवत सहकारी बाबासाहेब परांजपे नुकतेच मराठवाडा प्रदेश काँग्रेसच्या अध्यक्षपदी निवडले गेले होते. त्यांनीही काँग्रेसचा राजीनामा दिला. स. कृ. ऊर्फ भाऊसाहेब वैशंपायन, आ. कृ. वाघमारे, शामराव बोधनकर, श्रीनिवासराव बोरीकर, विनायकराव चारठाणकर, अनंत भालेराव, काशीनाथ जाधव, पु. ना. चपळगावकर, वगैरे बिनीच्या कार्यकर्त्यांची एक सेनाच मराठवाड्याच्या काँग्रेसमधून बाहेर पडली. एका अर्थाने स्वामीजी पक्षामध्ये बरेच पंगू झाले. असाच परिणाम तेलंगण व कर्नाटकात झाला. पी. व्ही. नरसिंहराव, के. व्ही. नरसिंहराव, वि. पां. देऊळगावकर, हैद्राबाद शहरात ज. रा. बर्दापूरकर वगैरेंनीही गोविंद-भाईंच्या बरोबर काँग्रेसला रामराम ठोकला.

स्वामीजींनी या काळात स्वत: गोविंददास श्रॉफ यांना एक पत्र लिहिले, त्यावरून त्यांच्या मनाची अस्वस्थता व त्यांना झालेल्या वेदनांची कल्पना येते. स्वामीजींनी या पत्रात म्हटले आहे की, " मला तुमच्या विचारांची व निष्ठांची कल्पना आहे तुम्ही आपल्या निष्ठांसह सध्याच्या काँग्रेस पक्षात राहू शकत नाही हे मी जाणून आहे. इतकी वर्षे आपण एकत्र राहिलो. अनेक स्वप्ने बघितली. पुष्कळ घडविण्याचा प्रयत्न केला. काही जमले. पुष्कळ जमले नाही तथापि आयुष्याचा मोठा व महत्त्वाचा काळ आपण खांद्याला खांदा भिडवून एका सरंजामी

व्यवस्थेशी संघर्ष करण्यात घालविला. त्याकाळाच्या स्मृती लोपणाऱ्या नाहीत. उभयतांच्या मनात कायम कोरल्या गेलेल्या त्या सोनेरी स्मृती आहेत. तथापि आपले मार्ग येथून पुढे भिन्न होत आहेत. वाटा फुटत आहेत. तुम्ही काँग्रेसमध्ये नसला तरी तुमचे चरित्र व तुमची दानत मला माहीत आहे. तुमच्याकडून देशाचे व जनतेचे भलेच होईल असा मला विश्वास आहे. मी तुमच्याबरोबर नसलो तरी जेव्हा केव्हा माझी गरज भासेल तेव्हा कळवा. मी धावत तुमच्या मदतीला येईन. ''
स्वामीजींच्या खाजगी चिटणिसांनी यासंबंधी असे लिहून ठेवले आहे की, तीन-चार दिवस स्वामीजी अत्यंत अस्वस्थ होते. रात्रीच्या-रात्री त्यांनी जागून काढल्या.

स्वामीजींनी अशाही परिस्थितीत अंगीकृत कार्य सोडले नाही. हैद्राबाद हे सरंजामी व प्रतिगामी हितसंबंधांचे एक कोठार आहे. ते नष्ट झाले पाहिजे. शेजारच्या तिन्ही भाषिक राज्यांमध्ये हैद्राबादचे तीन विभाग विलीन केले पाहिजेत. हे होईपर्यंत हैद्राबादचे संपूर्ण लोकशाहीकरण झाले पाहिजे. तेलंगणमध्ये विषम व अन्याय्य जमीन मालकीमुळे अत्यंत असमाधान पसरले होते. या परिस्थितीचा फायदा कम्युनिस्ट घेत होते. त्यांनी तेथे सशस्त्र बंडाळीच संघटित केली होती. हिंसक संघर्षाच्या द्वारेच जमिनीचा प्रश्न सुटेल अशी कम्युनिस्टांची धारणा होती. स्वामीजींनी या प्रश्नावर आपली शक्ती केंद्रित केली. आपल्या साप्ताहिकातूनही ते लिहू लागले. काँग्रेस संघटनेविषयी त्यांना काय वाटते, या संघटनेला वैचारिक दिशा द्यावयाची असेल व ती लोकांच्या दृष्टीने खरोखरीच काही प्रभावी बनवावयाची असेल तर तिची पुनर्उभारणी केली पाहिजे यासंबंधीचा अत्यंत निर्भीड विवेचक ऊहापोह त्यांनी केला. राज्यभर त्यांनी दौरे केले. मुस्लिम समाजाच्या मनातून भीती जावी व त्यांनी मुख्य राष्ट्रीय प्रवाहात येऊन दाखल व्हावे म्हणून त्यांनी मुसलमानांच्याही सभा घेऊन त्यांना समजावून दिले. धीर दिला. काँग्रेसला धर्मनिरपेक्ष ठेवण्याचा त्यांचा प्रामाणिक प्रयत्न होता.

स्वामीजींचे हे विचार केंद्रीय नेतृत्वाला पूर्णतया पटतील असे नव्हते. स्वामीजींनी स्वतःच लिहून ठेवले आहे की, ते स्वतः काँग्रेस

परिवारात नेहरूवादी म्हणजे नेहरूंच्या नजीकचे मानले जात असत. सरदार पटेलांना हैद्राबादचे नेतृत्व स्वामीजी व पुरोगामी मंडळीकडे जाऊ द्यावयाचे नव्हते. त्याप्रमाणे त्यांनी बदल करवून घेतला. पुढे स्वामीजी व वरिष्ठ नेतृत्व यांच्यातील दुरावा काही काळ वाढत गेल्याचे दिसते.

१९५२ हे पहिल्या निवडणुकीचे वर्ष. स्वामीजींनी लोकसभेसाठी गुलबर्ग्याहून निवडणूक लढविली. ते भरपूर मतांनी निवडून आले. याच अवधीत संयुक्त महाराष्ट्राची चळवळ महाराष्ट्रात फोफावू लागली होती. आंध्र प्रांतासाठी आश्वासन मिळाले होते व संयुक्त कर्नाटक-साठीही आंदोलने सुरूच होती. स्वामीजींचे या बाबतीतले विचार अत्यंत स्पष्ट असल्याने त्यांनी तिन्ही प्रांतांत—तेलंगण, कर्नाटक व मराठवाडा—जाऊन भाषिक पुनर्रचनेच्या मागणीला पाठिंबा दिला. शंकरराव देव यांच्या नेतृत्वाखाली जी संयुक्त महाराष्ट्र परिषद संघटित झाली होती तिचे स्वामीजी उपाध्यक्ष बनले व खुलेपणाने भाषिक पुनर्रचनेचा प्रचार करू लागले. या प्रश्नी त्यांचे व पंडितजींचे तीव्र मतभेद झाले.

१९५३ साली हैद्राबादी नानलनगर (स्टेट काँग्रेसचे पहिले अध्यक्ष गोविंदराव नानल यांच्या स्मरणार्थ अधिवेशनाच्या नगराला हे नाव देण्यात आले होते.) येथे अ. भा. काँग्रेसचे अधिवेशन झाले. पंडित नेहरू या अधिवेशनाचे अध्यक्ष होते व स्वामीजी स्वागताध्यक्ष. स्वामीजींनी स्वागताध्यक्ष म्हणून या अधिवेशनात जे भाषण केले त्यात हैद्राबादचे भाषेच्या आधारे तीन तुकडे करावेत व तिन्ही भाषिक भाग शेजारच्या राज्यात विलीन करावेत याचा जोरदार पुरस्कार केला. ते म्हणाले :—

'या संस्थानात आंध्र, महाराष्ट्र, कर्नाटक असे तीन भाषिक विभाग आहेत. हे भारतातील समभाषी राज्यांशी जोडलेले आहेत. भाषेच्या आधारे राज्यांची पुनर्रचना करण्याचे तत्त्व काँग्रेसने मान्य केले आहे, आणि त्यानुसार अंमलबजावणी करण्यास प्रारंभही झाला आहे. हैद्राबादच्या जनतेचा भारतातील त्या समभाषी प्रांतांशी फार घनिष्ठ संबंध असल्याने भाषिक पुनर्रचनेचा प्रभाव येथील जनतेच्या जीवनावर

पडणे अनिवार्यच आहे. आंध्र प्रांत तर निर्माण होतोच आहे. आज नाही तर उद्या अन्य भाषांची राज्येही बनतील. याप्रश्नी अखंड सावधान असण्याची जशी आवश्यकता आहे तशीच हे तत्त्व (भाषिक प्रांत-रचनेचे) निर्धाराने अमलात आणण्याची व त्या दिशेने पावले उचलण्याचीही निकड आहे. एक दिवस असा उजाडेल की, हैद्राबाद आणि भारत यांच्या दरम्यानच्या कृत्रिम सीमा नष्ट होतील व आम्ही भारताशी सर्वार्थाने एकरूप होऊ.'

पंडितजी व्यासपीठावर बसले होते. स्वामीजींच्या भाषणातील या मुद्द्याला टाळ्यांचा प्रचंड प्रतिसाद मिळाला. पंडितजी तसे उदारमनस्क आणि परमताचा आदर करणारे होते परंतु काय असेल ते असो, हैद्राबादचे बहुभाषिक स्वरूप टिकविण्यावर त्यांचा विशेष भर होता. त्यांचा असा समज करून देण्यात आला होता की, हैद्राबादेत अभूतपूर्व अशी दक्षिणी संस्कृती विकसित होत आली आहे. बहुभाषी आणि भिन्नधर्मीय असे या संस्कृतीचे स्वरूप आहे. इतरत्र भाषा आणि धर्म यांच्या नात्यावरून जे संघर्ष उडत असतात तसे येथे नसून लोक गुण्या-गोविंदाने नांदत आहेत. पंडितजींनी आपला हा विचार अनेकदा बोलून दाखविला होता. स्वामीजींच्या भाषणानंतर पंडितजी त्यांच्या स्वभावानुसार या प्रश्नाकडे दुर्लक्ष करतील अशी अपेक्षा होती. परंतु त्या दिवशी पंडितजीही आग्रही पवित्र्यात होते. त्यांनी भाषिक पुनर्रचनेच्या कल्पनेवर कडाडून हल्ला केला व ती होणार नाही असे निक्षून सांगितले. एकाच व्यासपीठावर हे घडलेले अनेकांनी पाहिले.

पंडितजी आणि स्वामीजींचे संबंध फार विश्वासाचे होते. १९३८ पासून दोघे गांधीजींच्या समान ऋणानुबंधाने बांधले गेले होते. तेच पंडितजी स्वामीजींवर नाराज झाले. इतके की, काँग्रेसमध्ये अशी जी प्रथा आहे की, अधिवेशनाचा स्वागताध्यक्ष काँग्रेसच्या कार्यकारिणीचा सदस्य म्हणून नेमला जातो ती प्रथा स्वामीजींच्या बाबतीत मोडली गेली. पुढे लोकसभेत जेव्हा जेव्हा भाषिक पुनर्रचनेचा प्रश्न निघाला त्या प्रत्येक वेळी पंडितजी स्वामीजींचे भाषण ऐकण्यासाठी लोकसभेत

अगत्याने हजर राहिले खरे, परंतु भाषिक पुनर्रचनेचे ते शेवटपर्यंत विरोधकच राहिले.

स्वामीजी आणि पंडितजींच्या दरम्यानचे संबंध किती घनिष्ठ व विश्वासाचे होते या संबंधीची एक घटना त्यांच्या खाजगी चिटणीसांनी एका लेखात नमूद केली आहे. वेलोडी यांच्या मंत्रिमंडळात जे चौघे लोकप्रतिनिधी घेतले गेले त्यांत उस्मानाबादचे फूलचंद गांधी होते. त्यांच्यासंबंधी असा प्रवाद होता की, पोलिस कारवाईच्या आधी स्टेट काँग्रेसचा जो कॅंप सोलापुरी व सरहद्दीवर होता त्याच्यामार्फत मुस्लिमांची फार मोठी कत्तल करण्यात आली व फूलचंदजीच त्यामागे होते. पोलिस कारवाईच्या पाठोपाठ ज्या कत्तली झाल्या त्यातही मुसलमानांची संख्या मोठी होती. उस्मानाबाद शहरात विधवा झालेल्या दहा हजार मुस्लिम स्त्रियांचा म्हणे मोर्चाच निघाला होता. अर्थात या सर्व गोष्टी तिखटमीठ लावून मौलाना आजादांच्या कानापर्यंत गेल्या होत्या. फूलचंदजींविरुद्ध अनेक कागाळ्या वरपर्यंत गेल्या होत्या. मौलाना खूपच संतप्त झाले होते. ५२ च्या निवडणुकीसाठी कोणाकोणाला तिकिटे द्यावयाची हे ठरविण्याचे ते दिवस होते. काँग्रेसच्या उमेदवारांत फूलचंदजींचे नाव होते. मौलाना आग्रह धरून होते की, फूलचंदजींना मंत्रिपदावरून काढावे व त्यांना पुढचे तिकीट देऊ नये. पंडितजींनी एके दिवशी स्वामीजींना दिल्लीस बोलावून घेतले व सर्व गोष्टी त्यांच्या कानावर घातल्या. स्वामीजींनी त्यांना सांगितले की, हा सर्व खोटा प्रचार आहे. त्यात काही सत्यांश नाही. पंडितजींनी लगेच मौलानांना बोलावून घेतले. मौलाना आल्या आल्या पंडितजींनी त्यांना सांगितले की, हैद्राबादेत ज्यांच्यावर विसंबता येईल असे स्वामीजी आले आहेत. तुमचे म्हणणे मी त्यांना सांगितले. मग मौलाना व स्वामीजींचे बोलणे झाले. मौलानांनी तेथल्या तेथेच सांगितले की, फूलचंद गांधीजींच्या विरोधातील कागदपत्रे जाळून टाका. स्वामीजींच्या धर्मनिरपेक्षतेवर माझा विश्वास आहे. फूलचंदजींना निवडणुकीचे तिकिट मिळाले. स्वतः स्वामीजींनीच पंडितजी व सरदार पटेल यांच्याविषयीच्या काही आठवणी नमूद करून ठेवल्या आहेत. सरदारांची

अशी इच्छा होती की, दूरवरचे वैचारिक प्रश्न तूर्त काढू नयेत. प्रथम हैद्राबादमधील लोकशाहीवादी शक्ती संघटित करू द्याव्यात. तोवर सरंजामदार, जमीनदार, जाहगीरदार यांना डिवचू नये. स्वामीजी व त्यांचे सहकारी स्वराज्याचा अर्थ निराळा करू लागले. जाहगिरी नष्ट करा. निजामाला राजप्रमुख करू नका. त्याला तनखा देऊ नका. जहागिरींना मोबदला देऊ नका, हैद्राबादचे तीन तुकडे करा, जमिनीच्या मालकीचे व कुळवाहिवाटीचे कायदे मूलत: बदलून घ्या असा त्यांचा धोशा चालू होता. काँग्रेस संघटनाही हितसंबंधी मंडळींच्या ताब्यात जाऊ देता कामा नये, असा स्वामीजींचा पवित्रा होता. सरदारांना हे पसंत नव्हते. स्वामीजींना त्यांनी मांगून पाहिले. स्वामीजी लिहितात की, "हैद्राबादचा प्रश्न त्यांनी (सरदार पटेलांनी) सर्वस्वी स्वत:च्या स्वाधीन ठेवला असल्याचे म्हटले जात होते. जसजसा आमचा परिचय वाढत गेला तसतसा आमच्या दोघांच्या दृष्टिकोणात खूपच फरक असल्याचे मला कळून आले. सैद्धांतिक दृष्टीने व भारतीय प्रश्नांकडे बघण्याच्या माझ्या विचारसरणीमुळे मी थोडाबहुत नेहरूवादी समजला जाऊ लागलो. आर्थिक व सामाजिक प्रश्नांच्या बाबतीत मी पंडित नेहरूंचेच धोरण अनुसरीत आलो होतो. शिवाय पंडितजी अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदेचे अध्यक्ष होते. तेव्हा अंतिम सूचना मला त्यांच्याकडूनच घ्यायला पाहिजे होत्या.

पुढे हैद्राबाद संस्थानातील लष्करी राजवट संपल्यानंतर राजकीय क्षेत्रात, थोडेसे वादळ निर्माण झाले होते. त्यावेळी मला सरदारांचा रोष पत्करावा लागला. त्यावेळी जे घडले त्यावरून माझा असा समज झाला की, सरदारांना हैद्राबाद संस्थानाचा कारभार त्यांच्या धोरणा-नुसार वागणाऱ्या माणसाच्या हातीच असावा असे वाटत असावे. . ."

सारांश, स्वामीजींनी आपल्या निष्ठा शेवटपर्यंत निर्धाराने जतन केल्या. थोरामोठ्यांच्या रागाल्होभाची पर्वा न करता ते आपल्या पद्धतीने झगडत राहिले.

स्टेट काँग्रेसच्या व संस्थानाच्या दैनंदिन राजकारणातून स्वामी-जींनी जवळ जवळ अंग काढून घेतले होते. या काळात जनरल

चौधरींच्या लष्करी राजवटीविषयी खूप असंतोष निर्माण झाला होता. जनतेचे नेते म्हणून स्वामीजी या सर्व गोष्टी दिल्लीला कळवीत व प्रसंगी लष्करी राजवटीवर टीका करीत. त्यांचे राजकीय विरोधक व लष्करी प्रशासक स्वामीजींना हिणवण्यासाठी पुष्कळदा असा सल्ला देत की, त्यांनी असल्या राजकारणात लक्ष घालण्याऐवजी तेलंगणात जाऊन बसावे व तेथे कम्युनिस्टांनी जो उच्छाद मांडला आहे त्याचा सामान करावा.

स्वामीजींच्या जीवनातील अत्यंत रोमहर्षक व पोलादी निर्धाराचे जे काही प्रसंग आहेत त्यांतील एक तेलंगणसंबंधीचाच आहे. स्वामीजींची ज्यांनी कम्युनिस्टधार्जिणे म्हणून भरपूर बदनामी केली तेच त्यांचे प्रतिस्पर्धी कम्युनिस्टांसमोर स्वामीजींनाच बळी देण्याचा घाट घालून होते. इकडे कम्युनिस्टांनी तेलंगणात व प्रामुख्याने नलगोंडा जिल्ह्या-तील हुजूरनगर व मिरयालगुडा या दोन तालुक्यांत जवळजवळ प्रति-सरकारच कायम केले होते. त्यांचे हे सशस्त्र बंडच होते. तेलंगणमध्ये कम्युनिस्टांनी एकीकडे सशस्त्र गनिमी पथके उभारून जमीनदार व मध्यमवर्गांवर दहशत बसविली होती. तर दुसरीकडे तेलंगणात फार मोठ्या प्रमाणावर जी भूमिहीन शेतमजूर जनता होती तिला आधार देऊन व तिच्या प्रत्येक अडीअडचणीसाठी धावून जाऊन त्यांनी प्रेमाचे फार मोठे स्थान निर्माण करून घेतले होते. गनिमी पथकाप्रमाणेच कम्युनिस्ट पक्षाची संघटना ही तेलंगणात फार चांगली होती. तेलंगणच्या जमिनीच्या मालकीची जी रचना परंपरेने चालत आली होती तिचाच फायदा कम्युनिस्टांनी घेतला. गावेची गावे एकेका मालकाची. हजारो एकरांचे हे बडे जमीनदार हंगामातील माल नेण्यापुरते आपल्या गावी येत. बाकीचे आयुष्य ते हैद्राबादेत घालवीत. कम्युनिस्टांनी जमिनीच्या प्रश्नालाच हात घातला. भूमिहीन शेतमजूर संघटित केले. त्यांची किसान दले उभारली. व जमीनदारांना हरप्रकारे हुसकून लावण्याचा सपाटा लावला. ते लोकांना असे सांगत की, नेहरूंचे जे सरकार दिल्लीत आले आहे तेच मुळात भांडवलदारांचे व जमीनदारांचे आहे. त्याच्याविरुद्ध लढले पाहिजे. आमचा लढा भूमिहीनांना जमिनी मिळवून देण्यासाठी

आहे. जे कोणी आमची साथ करतील त्यांना जमीनदारांच्या जमिनी वाटून दिल्या जातील. काही प्रमाणावर जमिनीच्या लोभाने व बऱ्हंशी दहशतीमुळे कम्युनिस्टांचा प्रभाव वाढत गेला. खरा प्रश्न जमिनीचा होता आणि प्रस्थापित सत्तेला (हैद्राबादेतील) तोच सोडवायचा नव्हता. त्यांची कल्पना अशी की, प्रश्न कायदा आणि व्यवस्थेचा आहे. कम्युनिस्ट हिंसा करतात तर लष्करी बळानेच ती निपटून काढली पाहिजे. म्हणून तेलंगणमध्ये सर्वत्र लष्कर पेरण्यात आले. स्वातंत्र्यानंतर अत्यंत भेसूर आणि भयाण अशा वास्तवाचा तेलंगणला सामना करावा लागला. दिवसा लष्कराचा नाच व रात्री कम्युनिस्टांचा. लष्कराला मदत केली की, कम्युनिस्ट सूड घेत व कम्युनिस्टांची मदत केली की, लष्कर हात दाखवी. अनेक लमाण तांडे व खेडी अशी होती की, त्यांनी कम्युनिस्ट बंडाळी सुरू झाल्यापासून रात्रीचे दिवे लावणे सोडून दिले होते. कम्युनिस्टांचा बीमोड करण्यासाठी मोठ्या प्रमाणावर धरपकड व गोळ्या घालून ठार करण्याची लष्कराची मोहीम तर लष्करावर मात करण्यासाठी कम्युनिस्टांची वाढती हिंसा व गमिमी हल्ल्याचे डावपेच यामुळे संपूर्ण तेलंगण निष्प्राण होऊन पडले होते. स्वामीजींनी लष्कराच्या अत्याचारावर टीका केली तेव्हा त्यांना असे सांगण्यात आले की, येथे बसून टीका काय करता ? हिंमत असेल तर तेलंगणात जाऊन राहा व प्रश्न सोडवा. स्वामीजींचा स्वभाव मुळातच शांत व मृदू होता. आव्हानाची भाषा ते कधी करीत नसत. परंतु या वेळी त्यांनी ठरविले की, कम्युनिस्ट आणि लष्कर दोघांची आव्हाने स्वीकारावयाची. तेलंगणातील कार्यकर्ते बोलावीत होतेच.

एके दिवशी स्वामीजींनी उमेतुल केशवराव या तेलंगणातील लोकप्रिय कार्यकर्त्याला बोलावून घेतले व आपण एक-दोन दिवसांत तेलंगणात राहायला येणार असे सांगितले. स्वामीजींच्या सूचनेप्रमाणे चिल्लेपल्ली या खेड्याच्या बाहेर एक झोपडी उभारण्यात आली. स्वामीजी, त्यांचे खाजगी चिटणीस पांगरीकर, उमेतुल केशवराव, आणखी दोघे असे पाचजण त्या झोपडीत राहू लागले. लोक अत्यंत भय-भीत होते व अत्याचारांनी खचले होते. स्वामीजी चिल्लेपल्लीला राहायला गेल्याचे समजले आणि त्यांच्याकडे एक लष्करी अधिकारी आला. म्हणाला,

तुम्हाला संरक्षण हवे आहे काय ? आम्ही ते देऊ. स्वामीजींनी त्याला नकार दिला व मला माझ्या पद्धतीने राहू द्या असे सांगितले. दररोज खेड्यापाड्यांतून जावयाचे, कोणाच्या घरी न जाता झाडाखाली आपलीच घोंगडी अंथरून गावकरी जमवायचे, त्यांना धीर द्यावयाचा, कम्युनिस्टांची धोरणे कशी चुकीची हे विस्ताराने सांगावयाचे व कम्युनिस्टांना आश्रय देऊ नका म्हणून आवाहन करावयाचे.

स्वामीजींचे बहुभाषित्व या वेळी फार उपयोगी पडले. तेलंगणच्या शेतमजुरांना व भूहीनांना स्वामीजी तेलगूच वाटले. तेलगू त्यांना अवगत होतेच. त्यांची भटकंती चालू होती. दिवसभर फिरून झाल्यावर चिल्लेपल्लीला परत यावयाचे. उमेतुल केशवराव यांनी एक बैलगाडी दिली होती. तेलंगणात त्याला खाचर म्हणत. नंतर एक मोटार मिळाली. एवढ्यावर स्वामीजींचे कार्य सुरू झाले. परिणाम दिसायला बराच उशीर लागला. कम्युनिस्ट आणि लष्कर दोघांचा त्रास होत असे. परंतु स्वामीजी तो सहन करून पुढे जात. हळूहळू कम्युनिस्टांनाही आपल्या चुका लक्षात येऊ लागल्या. लष्करालाही हे कळून आले की, स्वामीजी कम्युनिस्टांचे हस्तक नसून लोकांत निर्भयपणे वावरणारे ते धडाडीचे नेते आहेत.

तेलंगणातील आपल्या या वास्तव्यात स्वामीजी पंडितजींना व केंद्र सरकारला आपल्या कार्याचा साप्ताहिक अहवाल पाठवीत असत. स्वामीजींनी आपल्या अहवालातून तेलंगणाचा मुख्य प्रश्न जमिनीच्या विषम मालकीचा आहे, तो सोडवावा यावर भर दिला. जमिनीच्या मालकीची कमाल मर्यादा ठरवा. अतिरिक्त जमीन कुळांना वाटून द्या व कुळांना स्वत: कसण्यासाठी कायद्याचे संरक्षण द्या. या गोष्टींविषयी त्यांनी फार आग्रह धरला. कम्युनिस्टांना आंधळा विरोध करून व जमीनदारांची बाजू घेऊन लष्कराच्या बळावर हा प्रश्न सुटणार नाही हे त्यांनी निक्षून सांगितले. परिणामी ५२ च्या आधी कम्युनिस्ट पक्षावरची बंदी उठली. त्या पक्षाने पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीत भाग घेतला. लोकसभेत स्वामीजी आणि कम्युनिस्ट खासदार रविनारायण रेड्डी या दोघांनी तेलंगणविषयी परस्परविरुद्ध भूमिका मांडल्या. पंडितजींनी स्वामीजींच्या भूमिसुधारणांना जोरदार पाठिंबा दिला.

त्यामुळेच गुलझारीलाल नंदा व रा. कृ. पाटील या दोघा जाणकारांना हैद्राबादेत पाठविण्यात आले. त्यांनीही जमिनीच्या मालकीची मर्यादा खूपच खाली आणण्याची शिफारस केली. स्वामीजींच्या तेलंगण दौऱ्याचे जे परिणाम असतील त्यांपैकी सर्वांत महत्त्वाचा हा की, तेलंगणच्या जमिनीच्या मालकीवर मर्यादा आली व भारतातील पहिला कुळ-वहिवाटीचा पुरोगामी कायदा तयार झाला. स्टेट काँग्रेसमधील संघर्षाचे मूळ व्यक्तींच्या स्पर्धेत अगर द्वेषात नव्हते तर जमिनीच्या मालकी-संबंधीच्या प्रश्नात व राज्यपुनर्रचनेत होते. बी. रामकृष्णराव यांच्या मागे तेलंगणातील जमीनदार, हिंदू-मुस्लिम जाहगीरदार, वतनदार व भांडवलदार ही मंडळी होती व स्वामीजींच्या नेतृत्वाखाली त्या विरोधातील शक्ती संघटित झाल्या होत्या. झगडा हा होता. कुळ-वहिवाटीचा कायदा नव्या राजवटीला जबरदस्तीनेच पास करावा लागला. तो पास झाल्यानंतरही त्याची अंमलबजावणी द्रुतगतीने व दोषरहित झाली नाही. सत्तेत असणारांनी आपल्या सोयीसाठी सत्ता वापरली. वस्तुस्थिती अशी असली तरी स्वामीजींनी जो संघर्ष केला तो मूलतः कारणी लागला. ज्यांना मरण टाळावयाचे होते त्यांनी सत्तेच्या आश्रयाने मरणाला रात्र आडवी केली इतकेच.

स्वामीजी १९५२ आणि ११५७ या दोन निवडणुकांत अनुक्रमे गुलबर्गा व औरंगाबाद मतदारसंघातून लोकसभेवर निवडून गेले. त्यांचे पाच-सहा भाषांवर प्रभुत्व होते. लोकसभेच्या अनेक चर्चांतून त्यांनी भाग घेतला तेव्हा इंग्रजीचाच वापर केला. तो काळ असा होता की, भारतीय लोकसभेत भारतातील एकाहून एक वरचढ असे वक्ते, मुत्सद्दी, नेते आणि विद्वान लोकसभेचे सभासद होते. अशा लोकसभेत बोलणे सोपे नव्हते. स्वामीजी अशा थोड्या सभासदांत होते की, ज्यांच्या भाषणाच्या वेळी सभागृह तुडुंब भरलेले असे. पंडितजी स्वामीजींच्या भाषणाच्या वेळी आवर्जून हजर राहात. स्वामीजी सहसा लोकसभेत गैरहजर राहात नसत. त्यांनी आपल्या अभ्यासाचे तीन-चार विषय मुक्रर केले होते. परराष्ट्र धोरण हा त्यांचा आवडता विषय होता. त्यांचा पंडितजींच्या धोरणाला पाठिंबा असे. परंतु हंगेरीच्या वेळी स्वामीजींनी आपली मते स्पष्ट मांडली. त्यांच्या या स्पष्टवक्तेपणा-

मुळेही त्यांचे पंडितजींपाशी खास वजन होते. राज्य-पुनर्रचनेच्या बाबतीत स्वामीजींची मते सर्वज्ञात होती.

दोन वेळा लोकसभेवर निवडून आल्यानंतर स्वामीजींनी आपण होऊन निर्णय घेतला की, आता सांसदीय कामकाजातून मुक्त व्हावयाचे व कुठल्याच निवडणुकीला उभे राहावयाचे नाही. त्यांनी ६२ सालीच पंडितजींना पत्र लिहून तसे कळविले व आपल्याला निवृत्त होण्याची परवानगी द्यावी असे त्यांना लिहिले. पंडितजींना हे मान्य नव्हते. त्यांना आपल्या या सहकाऱ्याचे मोल माहीत होते. त्यांनी स्वामीजींना बोलावून घेतले. स्वामीजी ऐकणार नाहीत म्हणून त्यांचे खास मित्र व गुरुबंधू असणारे लाल बहादुर शास्त्री यांनाही बोलावले. आणखी एक वेळ स्वामीजींनी लोकसभेत यावे व निवडणूक लढवावी असे पंडितजींनी स्वामीजींना सांगितले. शास्त्रीजींनीही आग्रह केला. परंतु स्वामीजींचा निर्धार कायम राहिला. शेवटी त्यांनी राज्यसभेत यावे असेही सुचविण्यात आले. परंतु स्वामीजींनी नम्रपणे त्यास नकार दिला. पंडितजींनी स्वामीजींना निरोप दिला. ते प्रत्यक्षात तसे बोलले नाहीत परंतु निरोप देतानाचा त्यांचा भाव असा होता की, लोक-व्यवहार उलटा आहे. नको ती मंडळी येथे तिकिट मागायला येतात. त्यासाठी नाना लटपटी करतात. आणि स्वामीजी ही एक अशी व्यक्ती होती की, जी पुढ्यातले तिकिट अव्हेरीत होती. व्यवहाराला पारखे असणारे स्वामीजी म्हणूनच पंडितजींना व शास्त्रीजींना हवे होते. कामराज योजना वगैरे नंतर आल्या. त्या पूर्वीची ही घटना. ६२ साली स्वामीजी सांसदीय व निवड-णुकीच्या राजकारणातून नेहमीसाठीच निवृत्त झाले. परत त्यांनी त्या दिशेला वळून देखील बघितले नाही. संसार ज्या विरक्तीने सोडला तीच विरक्ती या वेळीही उपयोगी पडली. नंतर कधी स्वामीजींच्या तोंडून आपण लोकसभेत असे केले, तसे केले अन् मी तेथे असतो तर अमुक केले असते असे उद्गार कोणीच ऐकले नाहीत. तुकोबांच्या उक्तीप्रमाणे ‘संसारा आगी लावोनिया हाती, वळुनी मागुती पाहू नये.’ स्वामीजींनी त्या गावची विचारपूसही केली नाही.

❦ ❦

# ११

# संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीत सहभाग

भराभरा दिवस निघून गेले. दुसऱ्या निवडणुकीचा काळ येऊन ठेपला. १९५७ ला स्वामीजी परत लोकसभेसाठी या वेळी महाराष्ट्रातून म्हणजे मराठवाड्याच्या औरंगाबादेतून उभे राहिले व निवडून आले. त्या आधी म्हणजे १९५६ ला हैद्राबादचे तीन भाषिक तुकडे होऊन चुकले होते. स्वत: स्वामीजी हैद्राबादचे विभाजन करावे या मताचे आग्रही होते. आंध्रसाठी झालेल्या चळवळीशी व कर्नाटकाच्या आंदोलनाशी त्यांचा संबंध होता. इकडे महाराष्ट्रात शंकरराव देवांच्या नेतृत्वाखाली जी संयुक्त महाराष्ट्र परिषद कायम झाली होती तिचे स्वामीजी प्रमुख पदाधिकारी होते. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राची कैफियत कै. डॉ. धनंजयराव गाडगीळ यांनी फाजल अली कमिशनसमोर मांडली. तर हे कमिशन हैद्राबादी आले असता मराठवाड्याची कैफियत स्वामीजींच्या नेतृत्वाखाली गोविंददास श्रॉफ, बाबासाहेब परांजपे, आ. कृ. वाघमारे, प्रभृतींनी मांडली.

फाजल अली कमिशनचा अहवाल बाहेर येऊन १९५६ ला राज्य पुनर्रचना तर झाली परंतु याच वेळी मुंबईसह गुजरात व महाराष्ट्राच्या द्वैभाषिकाचा नवाच बूट निघाला. संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे अध्यक्ष शंकरराव देव या द्वैभाषिकांच्या कल्पनेने इतके पछाडले गेले की, त्यांना त्यात एका नव्या भारताचे दर्शन घडू लागले. याच वेळी पंडितजींनी संबंधित खासदारांना एकत्र बोलावले होते व त्यांची अनुमती द्वैभाषिकासाठी मागितली होती. स्वामीजींनी त्यांच्या नेहमीच्या नम्र परंतु

स्पष्ट पद्धतीने सांगून टाकले की, त्यांचा द्वैभाषिकाला सक्त विरोध आहे. ज्यांना प्रयोग करावयाचा असेल त्यांनी तो जरूर करावा परंतु ते मला (स्वामीजींना) मान्य असणार नाही. याच सुमारास केंद्रामध्ये बरीच स्थित्यंतरे झाली. ज्यांना द्वैभाषिक मान्य नव्हते त्यांनी या निर्णयाचा विरोध केला. या मतभेदांचे लोण थेट वरपर्यंत गेले.

स्वामीजींची भाषिक पुनर्रचनेच्या व प्रामुख्याने महाराष्ट्राच्या संदर्भातील आणखी मोठी देणगी नमूद करण्यासारखी आहे. तिन्ही भाषिक विभाग शेजारच्या समभाषी राज्यांत विनशर्त विलीन व्हावेत अशी स्वामीजींची आरंभापासून भूमिका होती. त्यामुळे मराठवाड्याने कसलीही अट न लादता महाराष्ट्रात विलीन होण्यास मान्यता दिली. संपूर्ण मराठवाड्याचा हा एकमुखी निर्णय होता. विदर्भातील तेव्हाचे पुढारी ब्रिजलाल बियाणी वगैरेंनी मराठवाड्याला महाविदर्भात सामील होण्याची पुष्कळ आमिषे दाखविली. परंतु त्यांना मराठवाड्यात एकही विश्वसनीय समर्थक मिळाला नाही. पुढे नागपूर करारासाठी बैठकी झाल्या. त्या बैठकी खूपच विवाद्य ठरल्या. प्रगत विभागाबरोबर आपण विलीन झालो तर आपली कधीच प्रगती होणार नाही अशी भीती विदर्भाच्या प्रतिनिधींच्या मनात असे व त्यांचे नेतृत्व तेव्हा लोकनायक बापूजी अणे यांच्यासारखे मातबर नेते करीत होते. अशा वेळी स्वामीजींचा फार उपयोग झाला. त्यांना स्वतः अटी घालून विलीन होणे मंजूर नव्हते. परंतु एकभाषिक राज्याच्या कल्पनेचे मुख्य उद्दिष्ट एकात्मता आणि विकासासाठी आवश्यक असणारी एकवाक्यता प्राप्त करणे हे होते. म्हणून स्वामीजींनी नागपूर कराराला मान्यता दिली. एवढेच नव्हे तर तिन्ही विभागांच्या प्रतिनिधींकडून तो मान्य करवून घेतला. श्री. द. का. कुंटे यांनी स्वामीजींविषयी लिहिताना नागपूर कराराचे फार मोठे श्रेय स्वामीजींकडे दिले आहे.

स्वामीजींना कल्पना नव्हती. परंतु पुढे असा काही योगायोग घडून आला की, त्यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीच्या वेळी स्वतः स्वामीजींनाच नागपूर करारांतर्गत वैधानिक विकास मंडळाची मागणी मराठवाड्या-साठी करावी लागली. राज्यकर्त्यांना हे मान्य झाले नाही ही गोष्ट

निराळी.

राज्य पुनर्रचनेच्या पूर्वी हैद्राबाद विधानसभेने मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीला पाठिंबा देणारा ठराव एकमताने संमत केला होता. या मागेही स्वामीजींचे परिश्रम व त्यांची फार मोठी पुण्याई होती.

सक्रिय राजकारणातून निवृत्त झाल्यानंतर स्वामीजींनी अनेक विधायक कार्यांकडे लक्ष देण्यास प्रारंभ केला. याच वेळी आणि पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या नंतर तेव्हाच्या हैद्राबाद राज्यातील सर्वपक्षीय कार्यकर्त्यांचे एक संमेलन गोविंददास श्रॉफ यांनी घेतले होते. सर्वांनी मिळून मराठवाड्याच्या विकासाविषयी काही ठोम मागण्या केल्या होत्या. स्वामीजी तेव्हाही गुलबर्ग्याचे प्रतिनिधी म्हणून लोकसभेत होते. पहिल्या योजनेत मराठवाड्यावर अन्याय झाल्याचे निदर्शनास आणून त्यांनी ते गाऱ्हाणे वरपर्यन्त नेले व रक्कम वाढवून घेतली.

मराठवाडा विद्यापीठ आणि मराठवाड्यातील मेडिकल कॉलेज यांच्या निर्मितीचे फार मोठे श्रेय स्वामीजींच्याकडे जाते. मराठवाडा विद्यापीठाने त्यांना ऑनररी डॉक्टरेट देऊन उतराई होण्याचा प्रयत्न केला असला तरी संपूर्ण शैक्षणिक प्रगतीच्या संदर्भात मराठवाड्याने स्वामीजींच्या ऋणात कायम राहिले पाहिजे इतकी त्यांची कामगिरी महनीय होती. मराठवाड्यातील केवळ योगेश्वरी हायस्कूलच नव्हे तर जवळ जवळ ८०, ९० टक्के राष्ट्रीय शाळा स्वामीजींच्या प्रेरणेतूनच निघाल्या आहेत ही वस्तुस्थिती आहे.

स्वामीजींनी तेलंगणमध्ये जाऊन व तेथे मुक्काम करून जे कार्य केले त्याचा उल्लेख या आधीच्या प्रकरणात विस्ताराने आलाच आहे. या घटनेनंतर आचार्य विनोबा भावे शिवरामपल्ली येथे सर्वोदय संमेलनासाठी आले असताना त्यांच्या कानी तेलंगणात कम्युनिस्टांनी चालविलेल्या रक्तपाती आंदोलनाची बातमी गेली. त्यांनी स्वामीजीं-कडून संपूर्ण माहिती घेतली. तेलंगणातील जमिनीच्या मालकीची पद्धती, वहिती, कुळवहिवाट, शेतमजुरांची स्थिती व शिरजोर जमीनदार आदी प्रश्न समजावून घेतले. त्याच वेळी विनोबाजींनी तेलंगणात जाण्याचा

विचार केला व ते गेलेही. भूदान यज्ञाचा हा प्रारंभ होता. विनोबांच्या या दौऱ्यात स्वामीजीही होते. विनोबाजींनी पहिली मोठी भूदानें तेलंगणात मिळविली व तेथूनच त्यांनी या भूदान यज्ञ कल्पनेचा पुढे विस्तार केला. स्वामीजींवर गांधीजींचा प्रभाव होताच. विनोबाजींची मते त्यांना गांधी विचारानुसार क्रांतिकारक वाटली. भूदान कल्पनेने तर त्यांना भारूनच टाकले होते. विनोबाजींचा तेलंगण दौरा संपला व तेव्हापासून तेलंगणातील भूदान आंदोलनाचे प्रवर्तन स्वामीजींनीच केले. भूदान आंदोलन विकसित होऊन विनोबाजींनी त्याला ग्राम-स्वराज्य, ग्रामदान, प्रखंडदान वगैरेंची जोड दिली. त्या वेळी वर्ध्याला जे सर्वोदय संमेलन झाले तेथेच जयप्रकाशजींच्या समवेत ज्यांनी जीवनदान केले त्यांत स्वामीजींचा समावेश होता.

येथून पुढे स्वामीजींनी खादी ग्रामोद्योग कार्याकडे लक्ष देण्याचे ठरविले. ते हैद्राबाद खादी समितीचे अध्यक्ष बनले. हैद्राबादेत या समितीमार्फत मेटपल्ली येथे खादी उत्पत्ती केंद्र होते. राज्यभर दोन-तीनशे पूर्णवेळ कार्यकर्ते होते व वार्षिक व्यवहार काही लाखांत होता. स्वामीजींनी हे काम हाती घेतले आणि कार्यकर्त्यांच्या संख्येतच केवळ वाढ झाली असे नव्हे तर उलाढालही कोटी सव्वा कोटीच्या जवळपास वाढली. स्वामीजींच्या कारकीर्दीतच मराठवाडा विभागात औसा येथे खादी उत्पत्ती केंद्र सुरू झाले. त्याचप्रमाणे औसा आणि नांदेड येथे हातकागदाचे उत्पादन सुरू झाले.

याच काळात स्वामीजींनी नांदेड आणि अंबाजोगाई येथील महाविद्यालयांकडे विशेष लक्ष दिले. ६२ च्या आधीच स्वामीजींच्या मनात राजकीय विरक्ती निर्माण होऊ लागली होती. पुढे १९६४ मध्ये त्यांनी पीपल्स कॉलेज व खादी समिती वगळून बाकी सर्व संस्थांच्या अधिकारपदांचा राजीनामा दिला. त्यांच्या मनात बरेच दिवसांपासून असे घोळत होते की, आपण स्वामी रामतीर्थांच्या आश्रमातच राहायला जावे. निवृत्तीची तीव्रता वाढत गेली व १९६५ मध्ये ते सरळ पितापुरम् येथे स्वामी रामतीर्थांच्या आश्रमात निघून गेले. ज्या आकस्मिकपणे त्यांनी हिप्परग्याला संन्यास दीक्षा घेतली तीच

आकस्मिकता या वेळीही दिसून आली. स्वामीजींचे आणखी एक गुरु-बंधू ओंकार स्वामी पितापुरम् (केरळ) येथे होते. त्यांच्या सहकार्याने स्वामीजींनी जयप्रकाशजी व विनोबाजी यांच्याशी विचार-विनिमय करून 'स्वामी रामतीर्थ इन्स्टिटयूट ऑफ पीस" या संस्थेची स्थापना केली. कल्पना अशी होती की, पितापुरम् आश्रमात देशातील समाज-सेबा करू इच्छिणाऱ्या तरुणांना एकत्र करून त्यांच्यावर अध्यात्म व विज्ञान यांचे संस्कार करावेत. तसे साहित्य तयार करावे. प्रशिक्षणा-साठी एक नियमित अभ्यासक्रम आखावा आणि देशभर अशी केंद्रे वाढवावीत. स्वामी रामतीर्थांचा शिष्यवृंद दक्षिणेप्रमाणेच उत्तरेत बऱ्याच प्रमाणावर आहे. स्वतः लाल बहादुर शास्त्री, संपूर्णानंद हे रामतीर्थांच्या शिष्यवरांपैकी होते. या सर्वांना एकत्र आणून स्वामी रामतीर्थ मिशन देशभर सक्रिय करावे असा स्वामीजींचा मानस होता. लखनऊ येथे स्वामी रामतीर्थांचा मुख्य आश्रम आहे. स्वामी राम-तीर्थांचे समग्र वाङमय प्रकाशित करण्याची त्यांनी व्यवस्था केली. या कामाचा व्याप हळुहळू वाढवीत न्यावा असे ठरवून स्वामीजी पिता-पुरम्ला परत आले आणि १९७१ मध्ये ते एकदम आजारी पडले. पक्षाघाताच्या आजाराने त्यांचा एक पाय आधीच अधू झालेला होता. तोच आजार परत बळावला. डॉक्टरांच्या सल्ल्याने असे ठरले की, केरळातील हवा स्वामीजींना मानवत नसल्याने त्यांना अंबाजोगाईला हलवावे. त्याप्रमाणे त्यांचा मुक्काम अंबाजोगाईला हलविण्यात आला. परंतु स्वामीजी या दुखण्यातून चांगले धडधाकट होऊन उठलेच नाहीत. कसेबसे वर्ष कडेला लागले. अंबाजोगाईला प्रकृती बिघडली म्हणून त्यांना हैद्राबादी नेण्यात आले. डॉ. मेलकोटे हे स्वामीजींचे अनन्य भक्त व सहकारी होते. शिवाय स्वामीजींच्या शिष्योत्तमांपैकी पी. व्ही. नरसिंहराव (आताचे परराष्ट्र मंत्री) हे आंध्रचे मुख्यमंत्री होते. त्यांनी स्वामीजींना औषधोपचार देऊन त्यांची प्रकृती सुधारण्याची पराकाष्ठा केली, परंतु त्यात त्यांना यश आले नाही. मृत्यूच्या आधी साधारण पंधरा दिवस स्वामीजींनी ध्यासच घेतला होता की, त्यांना दवाखान्यात न ठेवता त्यांच्या निवासस्थानी न्यावे व औषधोपचार

बंद करावा. आपला अंतकाळ जवळ आल्याचे त्यांना जणू कळून चुकले होते. गेल्या चाळीस पन्नास वर्षांतील विविध क्षेत्रांतील लहान मोठे सहकारी भेटायला येत. स्वामीजी काहींना बोलावून घेत. जवळ जवळ सर्वांचा निरोप घेण्याचीच प्रक्रिया त्यांनी सुरू केली होती. त्यांची अखेरची इच्छा म्हणून त्यांनी इंदिरा गांधींना पत्रद्वारे असे कळविले की, स्वामी रामतीर्थांची जन्मशताब्दी शासनाने साजरी करावी. इंदिराजींचे तसे पत्र आले आणि २२ नेवारी १९७२ ला दुपारी ३ वाजून ३५ मिनिटांनी स्वामीजी अनंतात विलीन झाले. हैद्राबादच्या स्वातंत्र्याकरिता आणि भारतीय स्वातंत्र्याला परिपूर्णता आणण्यासाठी ज्यांनी अविश्रांत कष्ट उपसले व सर्व देशी संस्थानात अनेक अर्थांनी बिकट व अवघड असलेल्या हैद्राबाद संस्थानाचे तीन भाषिक राज्यांत विसर्जन केले ती गेल्या दीड–दोन तपांची धडपड, स्वामीजींच्या मृत्यूच्या रूपाने विसावली. संस्थानी जनतेचे अत्यंत निर्मळ, स्वच्छ दृष्टीतून ज्यांनी अखंड नेतृत्व केले व स्वातंत्र्याचे ध्येय सिद्धीस नेले तो नेताच निरोप घेऊन निघून गेला होता. स्वामीजींना शासकीय सन्मानाने बेगमपेठ येथे त्यांच्या आश्रमातच समाधिस्त करण्यात आले. या दिवशी संपूर्ण हैद्राबाद आणि सिकंदराबाद शहर आपल्या या मुक्तिदात्याचे अखेरचे दर्शन घेण्यासाठी स्वामीजींच्या प्रेतयात्रेत सामील झाले होते. स्वामीजी एक परिव्राजक होते. एका पार्थिवाखेरीज त्यांचे असे काहीच नव्हते. प्रपंच नव्हता, घरदार नव्हते. जसा जन्मला तसा एक आत्मा अक्षरशः निःसंग परतला. पार्थिव ज्याचे त्याला स्वाधीन करून एका अनिकेताची इहलोकीची यात्र संपली. अनेकांना सनिकेत करणारा स्वतः अनिकेत होता. अनेकांच्या प्रपंचांत सुख-समाधानाचे दिवस यावेत म्हणून धडपणारा हा लोकविलक्षण संन्यासी होता. संपूर्ण विश्वात या वैराग्यवंताचे घर सामावले होते. त्याग आणि अपरिग्रहाचे प्रतीक म्हणून भगवी वस्त्रे धारण करणारा हा त्यागशील नेता हैद्राबादच्या जनतेच्या इतिहासावर पानो-पानी आपल्या व्यक्तिमत्त्वाचे, चारित्र्याचे आणि धीरोदात्ततेचे ठसे उमटवून अंतर्धान पावला.

देशातील सर्व संस्थानिकांमध्ये सर्वांत जास्त सधन व इंग्रजी

साम्राज्याचा खास दोस्त आणि सर्वांत जास्त सामर्थ्यवान असणाऱ्या निजामाची सल्तनत एका संन्याशाच्या हातून संपुष्टात यावयाची होती. स्वामीजी म्हणत असत की, माझा पिंड राजकारण्याचा नाही, आपल्या वाट्याला येईल ते कर्तव्य सचोटीने पार पाडावे अशी माझी वृत्ती आहे. त्यांनी त्यांचे कर्तव्य चोख बजावले.

❦ ❦

# १२

# स्वामीजींची वैचारिक परंपरा

स्वामीजींचा मूळ भावनिक व वैचारिक पिंड निवृत्तीचा व विरक्तीचा होता. बालपणापासूनच त्यांच्यावर साधु-सन्याशांचा चटकन प्रभाव पडत असे. याच प्रवृत्तीची वाढ होऊन ते हिप्परग्याला येऊन संन्यासी झाले. त्यांनी स्वतःच आपल्या या अध्यात्मिक प्रवृत्तीविषयी पुढीलप्रमाणे लिहिले आहे.

‘ ईश्वर म्हणजे पावित्र्य असे म्हणतात. लहान-लहान विद्यार्थ्यांच्या स्वरूपात इथे (हिप्परग्याच्या शाळेत) परमेश्वरच वास करीत होता... निवांत अशा ग्रामीण परिसराने माझ्यामधील आध्यात्मिक प्रवृत्ती अधिक वळावत चालली. ’

या काळात व पुढे स्वामीजींच्या भावविश्वात व विचार-विश्वात स्वामी रामतीर्थांच्या बरोबरच रामकृष्ण परहंस, विवेकानंद, ज्ञानेश्वर, गांधी आणि रवींद्रनाथ टागोर यांनी प्रवेश केला. स्वामीजी संन्यासी व अध्यात्मवादी होते. परंतु त्यांच्या मृत्यूपर्यंत कोणीही कसल्या धार्मिक अगर आध्यात्मिक साधनेत, उपासनेत, मंदिरात, भजन-पूजनात त्यांना बघितले नाही. हैद्राबादचे आंदोलन ऐन भरात असताना ते एकदा रमण महर्षींच्या आश्रमात गेले होते. त्यांच्या सहवासात त्यांनी काही तास घालविले. निरोप घेताना त्यांनी रमण महर्षींना प्रणाम करून अंगीकृत कार्यासाठी त्यांचा आशीर्वाद मागितला. एवढा एक प्रसंग सोडला तर पुन्हा कधी स्वामीजी देवाधर्माच्या अगर साधु-संतांच्या यम–नियमात आणि कर्मकांडात गुंतलेले दिसले नाहीत. जनता हीच माझी ईश्वर आणि

जनसेवा हीच ईशसेवा हे ब्रीद त्यांनी शब्दशः पाळले. फावल्या वेळी आणि विशेषतः एकांतात असताना ते भगवद्गीता वाचीत असत. अमृतराय, सूरदास आणि मीराबाई यांची काही भजनेही ते म्हणत. हिप्परग्याला त्यांनी ज्ञानेश्वरी वाचली व प्रवचनेही केली. परंतु यापेक्षा जास्त परिणाम अध्यात्माने, अथवा धर्मप्रवणतेने त्यांच्यावर केला नाही.

कदाचित स्वामीजींच्या या निवृत्तीनेच त्यांना गांधींकडे ओढीत नेले. गांधीजींचे विचार, त्यांनी सांगितलेली साधना आणि त्यांनी प्रतिपादन केलेला गांधीवाद यातच स्वामीजींना आपल्या अध्यात्माची व निवृत्तीची पूर्तता वाटली. निजामाबाद तुरुंगात असताना त्यांना दीर्घकाळ एकांतवासात राहावे लागले. तेथे त्यांनी भारतीय तत्त्वज्ञान व प्रामुख्याने उपनिषदांचा अभ्यास केला. या क्षेत्रात त्यांनी आचार्य विनोबाजींचे विवेचन व मार्गदर्शन प्रमाण मानलेले दिसते.

विरक्तीने त्यांना ज्याप्रमाणे गांधीप्रणीत अपरिग्रहासह एकादश-व्रताकडे नेले त्याचप्रमाणे स्वामित्व कल्पना अव्हेरून समतेचा पुरस्कार करणाऱ्या समाजवादाचाही त्यांच्यावर पगडा बसला. कार्ल मार्क्सचा प्रभाव त्यांच्यावर एवढ्यापुरता जरूर जाणवत असे. तथापि स्वामीजी मूलतः गांधीवादी असल्याने समाजाचा घटक अथवा आधार म्हणून जो माणूस मार्क्सने सांगितला त्यापेक्षा तो त्यांना निराळा प्रतीत झाला. माणूस हा उत्पादन साधनांनी व आर्थिक संबंधांनी बद्ध व केवळ परि-स्थितीचे अपत्य नव्हे तर मूलतः आणि अवश्यमेव सद्भावनेचा वाहक आहे. आध्यात्मिक भाषेत याचेच वर्णन परमेश्वरी अंश अथवा चैतन्य असे केले जाते. स्वामीजींनी ती भाषा वापरली नाही परंतु त्यांचे मूलतः असे विवेचन असे की, माझा माणसावर व त्याच्या ठायी असलेल्या सद्भावावर विश्वास आहे. त्यांच्यासाठी ही एक अविचल निष्ठाच असल्याने ते साम्यवादापेक्षा लोकशाहीचे पुरस्कर्ते बनले. समष्टीच्या नावावर पक्ष आणि शासन यांची अधिसत्ता प्रस्थापित करणाऱ्या साम्यवादाचा त्यांनी म्हणूनच अव्हेर केला. मात्र स्वामित्व विसर्जन, अपरिग्रह, समता आणि शोषणरहित व्यवस्था यावर त्यांनी केवळ गांधीवादी म्हणूनच भर दिला नाही तर साम्यवादाचा ठपका येईपर्यंत आग्रह धरला.

शोषणरहित समाजाच्या निष्ठेमुळेच ते तेलंगणातील जमिनीच्या मालकीच्या प्रश्नावर खवळून उठले. परंपरावादी सरंजामदार व जमीनदार यांचा कडवा विरोध पत्करून स्वामीजी कम्युनिस्टांच्या दहशतवादी व हिंसक चळवळीने अशांत बनविलेल्या तेलंगणात जाऊन राहिले. खेड्याखेड्यांत हिंडले. लोकांचा हरवलेला विश्वास त्यांनी परत मिळवून दिला. एकीकडे कम्युनिस्टांची दहशत तर दुसरीकडे भारतीय लष्कर व पोलिसांची दडपशाही या कोंडीत दडपला गेलेला ग्रामीण तेलगू समाज स्वामीजींनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण गांधीवादी पद्धतीने व निर्धाराने पुनरुज्जीवित केला. स्वामीजींनी अहिंसा, मनापासून एक जीवनव्रत म्हणून स्वीकारली होती. गांधीजींनी आपल्या सत्याचे प्रयोग या आत्मचरित्रात 'अहिंसा ही नम्रतेची परमावधी आहे.' अशी जी अहिंसेची व्याख्या केली ती त्यांनी पूर्णतया मान्य केली होती. म्हणून स्वामीजींच्या आग्रहात, निग्रहात आणि विरोधात निरपवादपणे एक प्रकारची ऋजुता व नम्रताच प्रकर्षाने आढळून आली. हैद्राबादच्या पोलिस कमिशनरांना ऐन निर्वाणीचा इशारा देतानाही त्यांनी चैतन्याचा अंश म्हणून संबोधले होते. निजामाने आपले स्वातंत्र्य पुकारले व भारताच्या सार्वभौमत्वाचा अधिक्षेप केला तेव्हा स्वामीजींनी निजामाला तुम्ही सर्वनाशाच्या कड्यावर उभे आहात, विचार करून मागे फिरा अशी ताकीद देतानाही त्यांच्या शब्दात कुठे कटुता आली नाही. हेच स्वामीजी पुढे पोलिस कारवाईनंतर हैद्राबादचे तीन तुकडे करा, निजामाला राजप्रमुख करू नका, जाहगीरदारी व जमीनदारी नष्ट करा, वतने खालसा करा, यासाठी सातत्याने आग्रह धरीत राहिले. स्वामीजी पोलिस कारवाईपर्यंत हैद्राबाद संस्थानातील त्रिभाषिक जनतेचे अनभिषिक्त नेते होते. त्यांच्या वैचारिक प्रकृतीचा शोध घेताना काही गोष्टी विशेषत्वाने लक्षात घेण्याची गरज आहे.

स्वामीजी हिंदू परंपरेप्रमाणे संन्यासी होते. तथापि त्यांच्या संपूर्ण आयुष्यात कुठेही हिंदू धर्म, भारतीय परंपरा, वर्णव्यवस्था, दैववाद, पुनर्जन्म, पूर्वजन्मीचे कर्मफल आदींविषयी दुरभिमान तर सोडाच परंतु उल्लेखसुद्धा आढळत नाही. कधी कधी तर ते निरीश्वरवादी असावेत

इथपर्यंत त्यांचे सार्वजनिक जीवन ईश्वर व भक्ती यांपासून दूर होते. त्यामुळे स्वामीजींवर त्यांचा शत्रूदेखील हिंदुत्ववादाचा अगर धर्मांधतेचा आरोप करू शकत नाही. त्यांनी गांधीजींच्या सर्वधर्मसमभावासह धर्मनिरपेक्ष विचार, निष्ठा म्हणून स्वीकारला होता. हैद्राबाद संस्थानात हिंदूंची संख्या ८५ टक्के व मुस्लिम ११ टक्के. अल्पसंख्य मुस्लिमांना सर्व प्रकारच्या सवलती मिळालेल्या. सरकारी नोकऱ्यांत त्यांचाच भरणा. आपणच राजे आहोत अशी भावना निजामाने व इत्तेहादुल मुस्लिमीनने पक्की रुजविलेली. अशा अवस्थेत हैद्राबादेतील बहुसंख्येची कोणतीही चळवळ जातीयवादी ठरण्याचाच संभव अधिक होता. उभय बाजूंच्या जातीयवाद्यांनी तसा प्रयत्न केला व स्टेट काँग्रेसमध्ये मुस्लिम नाहीत म्हणून ती हिंदूंची संघटना आहे असा तिच्यावर आरोप केला. तथापि स्वामीजींच्या नेतृत्वाचा विशेष असा की, त्यांनी स्वातंत्र्य आंदोलनाला अंशमात्रानेही धार्मिक व जातीय स्वरूप येऊ दिले नाही व त्यांच्या नेतृत्वाखाली इत्तेहादुल मुस्लिमीनप्रणीत रझाकारांशी मुकाबला करणारा सशस्त्र लढा झाला. तरी देखील त्याचे स्वरूप सरंजामी एकतंत्री सत्ता विरुद्ध जनता, प्रस्थापित हितसंबंध विरुद्ध स्वातंत्र्यवादी जनता यांच्या दरम्यानचा धर्म-निरपेक्ष संघर्ष असेच राहिले. इतर कोणाही नेत्यापेक्षा स्वामीजींची धर्मनिरपेक्षता अवघड कसोटचांवर उतरलेली होती.

हैद्राबाद संस्थानात तेलगू, कानडी, मराठी आणि उर्दू असे चार भाषिक गट व विभाग होते. त्यांच्या नेतृत्वाला व विधायक कार्याला भक्कम आधार नेहमीच मराठवाड्याने पुरविला. तथापि स्वामीजींवर त्यांच्या संपूर्ण हयातीमध्ये कोणीही प्रांताचे अथवा अमुक एका भाषेचे पक्षपाती म्हणून आरोप करू शकले नाहीत. एक तर ते स्वतःच चार-पाच भाषा उत्तम प्रकारे बोलणारे होते. कर्नाटकात ते जन्मले, महाराष्ट्रात त्यांच्या कर्तृत्वाला प्रारंभ झाला. व उमेदीची राजकीय हयात त्यांनी तेलंगणात घालविली. कानडी, मराठी, तेलगू, उर्दू, इंग्रजी या भाषांवर त्यांचे चांगले प्रभुत्व होते. हैद्राबादमध्ये तेलगू भाषिकांची बहुसंख्या होती. मधून मधून भाषावादही माजले. तथापि

स्वामीजी यापासून अलिप्त राहिले व सर्व भाषिक लोकांनी त्यांचे नेतृत्व भाषा व प्रांत यांच्या वादापासून अतीत मानले. त्यांच्या नेतृत्वाची शुद्धता व शक्ती या गुणांमुळे अधिकच वाढत गेली.

स्वामीजींच्या विचारांचा मागोवा घेण्यासाठी फारसे आधार उपलब्ध नाहीत. त्यांनी सुमारे वर्षभर चालविलेले ' व्हिजन ' हे इंग्रजी साप्ताहिक, त्यांनी स्वतः लिहिलेल्या आत्मचरित्रात्मक आठवणी आणि प्रत्यक्ष त्यांचे जीवन यावरूनच त्यांच्या विचारांचा वेध घेता येतो.

स्वामीजींचे पुरोगामी नेतृत्व त्या काळच्या सरंजामवादी, हित-संबंधी शक्तींना परवडत नव्हते म्हणून त्यांनी स्वामीजींना मधून मधून साम्यवादी ठरवून बदनाम करण्याचा प्रयत्न केला. स्वामीजींनी या विषयी विपुल लिहिले व निवेदनांतून अगर भाषणांतून आपले विचार स्वच्छ रीतीने मांडले आहेत. त्यांच्या म्हणण्यानुसार कम्युनिस्टांच्या उत्पाती व दहशतवादी चळवळीच्या किर्र अरण्यात एकाकीपणे शिरण्याचे जे धाडस त्यांनी केले त्यामागे गांधीवादाचीच प्रेरणा प्रमुख होती. त्यांच्या विरोधकांनी त्यांच्यावर आणखी दोन आरोप केले व त्यांच्याविरुद्ध अपप्रचाराची वादळी मोहीम पोलिस कारवाई-नंतर चालविली. त्यांत दोन आरोप मुख्य होते. एक आरोप होता स्वामीजींच्या अटकेनंतर तेव्हाच्या कृति-समितीने दिलेल्या आदेशा-नुसार स्टेट काँग्रेसने उभारलेला सशस्त्र प्रतिकार व त्यासाठी सीमांवर कायम केलेली, सशस्त्र केंद्रे यांच्या आधारे स्वामीजींच्या अहिंसेवरील निष्ठा शबल ठरविणे. दुसरा आरोप साध्य-साधनासंबंधीचा.

पहिल्या आरोपाचे खंडन आधीच्या प्रकरणातून आले असल्याने त्याच्या पुनरुक्तीची गरज नाही. दुसऱ्या आरोपासंबंधी थोडे तपशिलाने लिहिले पाहिजे.

पोलिस कारवाईनंतर स्टेट काँग्रेसमध्ये सत्तास्पर्धा सुरू झाली. संपूर्ण आंदोलन स्वामीजींच्या नेतृत्वाखाली झाले असल्याने संघटना व जनता, स्वामीजींच्या बाजूने होती. याचा मुकाबला स्वामीजींच्या प्रतिस्पर्ध्यांना व हैद्राबादेतील सरंजामी हितसंबंधींना सरळपणे करणे

अशक्य होते म्हणून त्यांनी अपप्रचाराचा आधार घेतला. पोलिस कारवाईच्या आधी सशस्त्र चळवळीचा भाग म्हणून नांदेड जिल्ह्यातील स्टेट काँग्रेसच्या सैनिकांनी नांदेडजवळच्या उमरी या गावातील निजामाच्या बँकेवर हल्ला केला व ती संपूर्ण बँक लुटली. वस्तुतः या घटनेचा प्रत्यक्ष स्वामीजींशी काही संबंध नव्हता. ते तेव्हा तुरुंगात होते. तथापि त्यांनाच या कृतीसाठी जबाबदार धरण्यात आले; पैसा-अडका व साधने यांच्या बाबतीत स्वामीजींवर बेदरकारीचे आरोप करण्यात आले. वस्तुस्थिती अशी होती की, ही उमरी बँकेवरील हल्ल्याची घटना अनेक अर्थांनी अभूतपूर्व होती. एवढा मोठा राजकीय हल्ला त्या आधी कधी झाला नव्हता. हल्ला यशस्वी झाला होता. महत्त्वाची गोष्ट अशी की, स्वतः सरदार पटेलांच्या आदेशावरून तेव्हा काँग्रेसचे सरचिटणीस असणारे शंकरराव देव यांनी उमरी बँकेच्या पैशाचा हिशेब पूर्णपणे तपासून घेतला होता. बरेच महिने ऑडिटर्स हिशेब तपासणीचे काम करीत होते. शंकरराव देवांनी यासंबंधी स्वामीजींना पत्र देऊन मुक्तकंठाने कार्यकर्त्यांच्या सचोटीची स्तुती केली. अशा सार्वजनिक घटनांपैकी हीच एक घटना अशी होती की, जिच्यातील पै न पैचा हिशेब देण्यात आला व लहानमोठ्या, सुशिक्षित, अशिक्षित, शहरी-गामीण, कार्यकर्त्यांपैकी कोणीही एकाही पैशाचा वापर आपल्या स्वार्थासाठी केला नाही. तथापि स्वामीजींच्या विरोधकांना निंदेसाठी हे हत्यार उपयोगाचे वाटले.

स्वामीजींचा उल्लेखनीय विशेष असा की, त्यांचा कधीही तोल गेला नाही. स्वातंत्र्यासाठी तळहातावर शिर घेऊन लढणाऱ्या कार्यकर्त्यांची त्यांनी शेवटपर्यंत साथ केली. उमरी बँकेचे कृत्य संघटनेचे नाही असे म्हणून त्यांना जबाबदारी टाळता आली असती. परंतु स्वामीजींच्या व्यापक परिवारात लहान-थोर कार्यकर्त्यांना एवढे अनन्य-साधारण स्थान होते की, त्यांना वाऱ्यावर सोडण्याची कल्पनाही स्वामीजींना शिवली नाही. नम्र परंतु चिवट योद्धयाप्रमाणे त्यांनी या अपप्रचाराचा सामना केला.

स्वामीजींनी प्रासंगिक अशा अनेक प्रश्नांवर आपले विचार

लेखनातून अगर भाषणांतून व्यक्त केले आहेत. रेशनिंग, धान्यवसुली, मातृभाषा माध्यम, शिक्षणात मूलोद्योगाला स्थान, उस्मानिया विद्यापीठाचे लोकशाहीकरण, काँग्रेस संघटनेची फेरउभारणी, काश्मीर प्रश्न अशा कितीतरी प्रश्नांविषयी त्यांनी मते व्यक्त केली आहेत. या सर्व मतांमधून व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी सद्भावनांवरचा विश्वास, गांधीप्रणीत शासन व्यवस्था, स्वातंत्र्य, धर्मनिरपेक्षता, लोकशाही आणि समाजवाद यांचा एक समर्थ आणि स्वच्छ विचारप्रवाह खळाळताना दिसतो. शेवटी शेवटी काँग्रेस संघटनेविषयी व दैनंदिन राजकारणाविषयी ते उदासीन झाले. कदाचित त्यांना शासनाच्या मर्यादा तीव्रतेने जाणवल्या असाव्यात व म्हणूनच लोकशक्तींना संघटित करण्याचा व लोककारणाचा विश्वसनीय मार्ग म्हणून सर्वोदयाकडे व भूदानाकडे ते वळले असावेत.

स्वामीजींमध्ये अलौकिक, असाधारण असे काही नव्हते. इतरांपेक्षा वेगळेपण होते ते त्यांच्या विरक्तीत व त्यागशीलतेत. सर्वसामान्य माणूस अविचल निष्ठेने किती मोठा होऊ शकतो याचे उदाहरणच त्यांनी आपल्यासमोर प्रत्यक्ष ठेवले. स्वामीजींच्या लेखनावर त्यांच्या एकंदर वृत्तीचा व गांधीजींचा बराच मोठा प्रभाव होता. त्यांचे इंग्रजी लेखन बव्हंशी हरिजनमधील गांधीजींच्या वळणाचे होते. स्वामीजींचा पिंड प्रामुख्याने श्रद्धाळू व भावनाशील होता. त्यांच्या वक्तृत्वामधून त्यांची भावनाशीलता व त्यांचा साधेपणा प्रकर्षाने उमटत असे. संथपणे कविता शिकविणाऱ्या एखाद्या शिक्षकाप्रमाणे ते बोलत असत. आक्रमण त्यांना कधी मानवलेच नाही परंतु आपले म्हणणे अस्तिपक्षी मांडताना त्यांच्या शब्दांतील अर्थ आक्रमणांना नमविणारे असत. त्यांच्या वक्तृत्वाचे दोन प्रसंग आठवतात.

मुंबईला चौपाटीवर हैद्राबादच्या प्रश्नी जाहीर सभा होती. स. का. पाटील यांनीच ती बोलावली होती. अध्यक्ष होते राजगोपालाचारी. राजाजींची कुशाग्रबुद्धी व त्यांचे तीक्ष्ण वक्तृत्व सर्वज्ञात होते. स्वामीजींच्या आधीच राजाजी बोलले व हे सांगून की, तुम्ही ज्या संन्याशाचे भाषण ऐकणार आहात त्यानंतर कोणी बोलण्याची गरजच

उरणार नाही. राजाजी थोडा वेळच बोलले. त्यांचे भाषण संपताच सभेत चलबिचल झाली. लोक जायला उठले. स्वामीजींची ती एका परीने परीक्षाच होती. स्वामीजी बोलायला उठले. अवघ्या काही मिनिटांतच त्यांनी श्रोत्यांच्या मनाचा ठाव घेतला. सुमारे तास-सव्वा-तास सभा मंत्रमुग्ध होऊन स्वामीजींचे भाषण ऐकत होती. शेवटी राजाजी परत बोलले व म्हणाले की, माझ्या भाषणासाठी खोळंबण्याची गरज नसणारे वक्तृत्व तुम्ही ऐकले आहेच.

दुसरा असाच प्रसंग मद्रासला टी. प्रकाशम् त्यांच्या उपस्थितीतला. प्रकाशम् यांच्या नंतर स्वामीजी बोलले व दीड तास त्यांनी मद्रासचे चोखंदळ श्रोते खिळवून ठेवले. भारतीय स्वातंत्र्याचे शेवटचे युद्ध ज्या हैद्रावादच्या भूमीवर लढले जाणार आहे त्या हैद्रावादचा मी प्रतिनिधी. वडील-भावाचा आशीर्वाद मागायला इथवर आलो असे म्हणून स्वामीजींनी ती सभा जिंकली. असे आणखी किती तरी प्रसंग. स्वामीजींनी आपल्या सार्वजनिक जीवनाचा प्रारंभ एका शाळेत अध्यापक म्हणून केला व शेवटी राजकारण सोडून ते परत त्यांनीच कायम केलेल्या शिक्षणसंस्थांच्या कामात लक्ष घालू लागले. सर्व गोष्टी शासनाच्या आधीन केल्या तर समाज व व्यक्ती पंगू व परावलंबी बनतील. त्यांच्यातील अभिक्रमच नाहीसा होईल. स्वामीजींनी आपल्या ऋजू आणि विनयशील स्वभावाला अनुसरून निजामाच्या पाशवी एकतंत्री सत्तेला फक्त एवढेच जतावले होते की, तुमचे काम तुम्ही करा व माझे मला करू द्या. तुमच्यापाशी दमनाची, दडपशाहीची व जुलूम जबरदस्तीची साधने विपुल आहेत तर माझ्यापाशी 'मोडेन पण वाकणार नाही ' अशी निष्ठा आहे. तुमच्याकडे सत्ता आहे तर माझ्या-कडे सत्य आहे. वर्तमान तुमचा असेल परंतु भविष्य माझे आहे. अशी जिद्द स्वतंत्र भारताच्या माणसांत व समाजात निर्माण करावयाची असेल तर त्याचा अभिक्रम मोकळा ठेवला पाहिजे. शासनाच्या पिंजऱ्यात तो कोंडता कामा नये. शासन कमी व स्वयंशासन जास्त हा संस्कार शिक्षणातून व विधायक कार्यांतून झाला पाहिजे. तेजस्वी व सत्यप्रिय समाज स्वयंकर्तृत्वातूनच निर्माण होऊ शकतो. या श्रद्धेतूनच

ते परत शिक्षणक्षेत्राकडेंच वळले होते. मुक्त मानवी समाजाचे सम्यक् दर्शन भारतीय समाजाच्या रूपाने घडावे अशी आशा बाळगीतच या परिव्राजकाने जीर्ण वस्त्र टाकून नवे धारण करावे इतक्या सहजतेने आपले पार्थिव येथेच सोडले व चिरंतन चैतन्याच्या हातात हात दिला. जणू निवृत्तीच निवृत्त झाली.

❀ ❀

संदर्भ :-

1) Memorandum submitted to British Cabinet Mission : by Hyderabad State Congress.

2) White paper on Hyderabad by Govt. or India

3) 'Hyderabad in Retrospect'
by : An ex-official of Hyderabad
" Times of India Publication. "

4) Story of the Integration of
Indian States. by- V. P. Menon.

5) End of An era—by K. M. Munshi

6) The Peoples, Movement in Hyderabad

7) संघर्ष- खंड पहिला व दुसरा
कै. आ. कृ. वाघमारे लेखसंग्रह
संपादक :- स. मा. गर्गे.

8) The Freedom Struggle in Hyderabad
Vol. IV (1921-47) Edited by-
N. Ramesan

9) Swami Ramanand Tirth
61 st Birthday Commemoration Volume.

10) Files of 'Vision' weekly, Edited by
Swami Ramanand Tirth

11) Files of 'New Life' daily Edited by
S. K. Vaishampayan

12) Files of Freedom weekly
Edited by- G. M. Shroff

13) Files of ' Marathwada ' Biweekly
Edited by A. K. Waghmare and Anant Bhalerao

14) Hyderabad Freedom Struggle Memoires
by Swami Ramanad Tirth.

15) Some files of Hyderabad
Archives and Historical Records.